पंचायत समिती विकास आराखडा व
जिल्हा परिषद विकास आराखडा
(BPDP/DPDP) तयार करण्याबाबत
मार्गदर्शक सूचना

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीपीडीपी-२०२१/प्र.क्र. २१/पंरा- ६**
**बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,**
**फोर्ट, मुंबई-४००००१**
तारीखः ०१ नोव्हेंबर, २०२१

<u>वाचा -</u>

१) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रा.वि.वि.जीपीडीपी-२०१५/ प्र.क्र.३८/पं.रा-६, दि.४नोव्हेंबर २०१५
२) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रा. वि. वि. पविआ-२०२१/प्र. क्र-५०/वित्त -४ दि. २० मे २०२१
३) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रा. वि. वि. बीपीडीपी-२०२१/प्र.क्र. २१/पंरा- ६ दि. १४ जून, २०२१

<u>प्रस्तावना -</u>

भारतीय राज्य घटनेच्या ७३ व्या घटना दुरूस्ती अन्वये, पंचायत राज संस्थांना अधिक सक्षम बनविण्यासाठी, सत्तेचे विकेंद्रीकरण, अधिकार व जबाबदा-यांच्या प्रदानाची आवश्यकता विशद केली आहे. प्रभावी विकेंद्रीकरण करतांना स्थानिक स्वराज्य संस्थांकडे अधिकारांचे हस्तांतरण (devolution), पारदर्शकता आणि सहभागी दृष्टीकोन यांचा अंतर्भाव असणे आवश्यक आहे. त्याकरीता समाजातील विविध घटक जसे शेतकरी, महिला, युवक/युवती, अनुसूचित जाती/ जमाती, इत्यादींचा संपूर्ण प्रक्रियेमध्ये सहभाग असणे आवश्यक आहे.

केंद्र शासनाच्या केंद्रीय कार्यकारी समितीच्या दिनांक ०९ ऑक्टोबर, २०१५ रोजी दिल्ली येथे झालेल्या बैठकीमध्ये “ग्राम पंचायत विकास आराखडा” तयार करण्याबाबत सूचना देण्यात आलेल्या आहेत. १४ व्या वित्त आयोगाचा निधी विनियोगासाठी प्रत्येक ग्रामपंचायतीचा विकास आराखडा तयार करणे आवश्यक असल्याने केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनेनुसार “आमचं गाव, आमचा विकास” या उपक्रमांतर्गत “ग्रामपंचायत विकास आराखडा” तयार करून त्याची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी वेळोवेळी शासन निर्णय / परिपत्रके निर्गमित करण्यात आलेली आहेत.

घटना दुरुस्तीने पंचायत राज संस्थांना संविधानिक दर्जा मिळाला तसेच एकसमान प्रशासकीय रचनाही मिळाली. काळाच्या ओघात पंचायती राज संस्था बळकट झाल्या असून त्या ग्राम प्रशासनात आणि विकासात महत्त्वपूर्ण योगदान देत आहेत. त्या ग्रामीण भारताची ओळख बनत आहेत, विशेषतः ग्रामपंचायती त्यांच्या अधिकार क्षेत्रातील विकासात मोलाची भूमिका बजावत आहेत.सन २०१५ पासूनच आपल्या भागाच्या विकासासाठी ग्रामपंचायत विकास आराखडा (GPDP) तयार करीत आहेत.

पंचायती राज मंत्रालयाने सर्वंकष अशा "ग्राम पंचायत विकास आराखडा तयार करण्यासाठीच्या मार्गदर्शक सूचना" सन २०१८ साली तयार केल्या. सन २०१८ पासून सर्वंकष असे ग्राम पंचायत विकास आराखडे (GPDPs) तयार करण्यासाठी " सर्वांची योजना, सर्वांचा विकास" या नावाने भारत सरकारच्या पंचायत राज आणि ग्रामीण विकास मंत्रालयाने एकत्रितरित्या "लोक आराखडा मोहीम" (People's Plan Campaign -PPC) जाहीर केली. अशा प्रकारच्या मोहिमेमुळे ग्राम विकास आराखड्यांची गुणवत्ता लक्षणीयरित्या सुधारली आहे.

१५ व्या वित्त आयोगाच्या शिफारसी नुसार भारत सरकारने १५ व्या वित्त आयोगाचा निधी ग्रामपंचायती, पंचायत समिती आणि जिल्हा् परिषदांना देण्याचे निश्चित केले. त्यानुसार ग्रामीण भागाच्या विकासासाठी ग्रामपंचायत विकास आराखड्याप्रमाणे पंचायत समिती विकास आराखडा (Block Panchayat Development Plan-BPDP) आणि जिल्हा परिषद विकास आराखडा (District Panchyat Development Plan-DPDP) तयार करण्यासाठी सर्वंकष सूचना असाव्यात असा विचार समोर आला.

**तालुका आणि जिल्हा पातळीवरील नियोजनासंदर्भात घटनात्मक तरतुदी**

भारतीय राज्यघटनेच्या कलम २४३ जी मध्ये “पंचायतींचे अधिकार आणि जबाबदाऱ्या संविधानाच्या तरतुदींच्या अधीन राहून राज्य विधानमंडळ कायद्याद्वारे पंचायतींना स्वराज्य संस्था म्हणून कामे पार पाडणे शक्य व्हावे या दृष्टीने त्यांना आवश्यक असतील असे अधिकार व प्राधिकार देऊ शकेल आणि आर्थिक विकास व सामाजिक न्याय यासाठी योजना तयार करणे; तसेच अनुसूची ११

मध्ये नमूद केलेल्या बाबी संबंधातील योजनांसहित यांच्याकडे सोपवण्यात येतील अशा आर्थिक विकास व सामाजिक न्याय विषयक योजनांची अंमलबजावणी करणे" अशा तरतुदी आहेत.

या तरतुदी पंचायतराज संस्थांच्या तिन्ही स्तरांना सक्षम करण्यासाठी करण्यात आलेल्या आहेत. यानुसार राज्य सरकार त्यांचे अधिकार आणि प्राधिकार पंचायतराज संस्थांना देऊ शकेल. यानुसार भारतीय राज्यघटनेच्या अकराव्या परिशिष्टातील जे विषय नमूद आहेत त्यानुसार आर्थिक विकास, सामाजिक न्यायाच्या योजनांचे नियोजन करणे आणि त्याची अंमलबजावणी करणे त्यांना सोयीचे होईल. या तरतुदींमध्ये कर लावणे आणि त्याद्वारे निधी उभारण्याचे अधिकार पंचायत राज संस्थांना देण्याचाही समावेश आहे.

भारतीय राज्य घटना अनुच्छेद २४३ जी अन्वये केंद्र, राज्य आणि पंचायतींच्या क्षेत्रात राबविल्या जाणाऱ्या सर्व कार्यक्रमांचे / योजनांचे एकत्रिकरण आणि समालोकन करून आर्थिक विकास आणि सामाजिक न्यायासाठी पंचायत समिती विकास आराखडा (BPDP) व जिल्हा परिषद विकास आराखडा (DPDP) तयार करणे गरजेचे आहे. याशिवाय स्थानिक प्रशासन म्हणून स्थानिक नागरिकांना मूलभूत सेवा पुरविणे आणि त्यांच्या भागातील गरीब व उपेक्षित घटकांच्या सुरक्षिततेकडे लक्ष देणे ही देखील स्थानिक प्रशासन व पंचायत समित्यांची जबाबदारी आहे. तसेच उपलब्ध संसाधनांचा कार्यक्षम आणि जबाबदारीने वापर करून सर्वसमावेशक योजनेच्या अंमलबजावणीद्वारेच हे साध्य केले जाऊ शकते व वेगवेगळ्या स्तरावर करण्यात येणाऱ्या कार्याची पुनरावृत्ती टाळता येवू शकते.

भारतीय राज्यघटनेचे कलम २४३ जी नुसार जिल्ह्याचे भौगोलिक क्षेत्रात पंचायत, राज्य व केंद्राचे असे सर्व कार्यक्रम/योजना एकत्रित करून आर्थिक विकास व सामाजिक न्यायासाठी जिल्हा परिषद विकास आराखडा तयार करणे व अमलात आणण्याबाबत निर्देश आहेत. याव्यतिरिक्त, स्थानिक सरकार म्हणून जिल्हा परिषद स्थानिक नागरिकांना मूलभूत सेवा पोहचविणे आणि लोकसंख्येतील गरीब आणि उपेक्षित घटकांच्या सुरक्षिततेची पूर्तता करण्याची जबाबदारी स्वीकारते. उपलब्ध संसाधनांच्या कार्यक्षम आणि जबाबदार वापराद्वारे आणि त्यांची प्राथमिकता पूर्ण करण्यासाठी संसाधनांचा विस्तार करून केवळ गरजांवर केंद्रित योजनांच्या अंमलबजावणीद्वारे हे साध्य केले जाऊ शकते. ग्रामपंचायत, पंचायत समिती, जिल्हा परिषद व राज्य शासनाच्या अन्य विभागांमार्फत हाती घेतलेली कामे दुबार केली जाऊ नये, याचीही काळजी घेणे आवश्यक आहे.

जिल्हा परिषद व पंचायत समिती विकास आराखडा दीर्घकालीन स्वरुपाचा (पाच वर्षांसाठी) तयार करावयाचा असून त्यापैकी एका वर्षामध्ये अंमलबजावणी योग्य असलेल्या कामाचा अग्रक्रम निश्चित करावयाचा आहे. जिल्हा परिषद व पंचायत समित्यांनी त्यांच्याकडे उपलब्ध असलेले

मनुष्यबळ, पायाभूत सुविधा आणि संस्थात्मक क्षमता यांचा विचार करून अंमलबजावणी करण्यास योग्य कामे हाती घ्यावयाची आहेत. अशी कामे हाती घेताना दोन किंवा त्याहून अधिक ग्रामपंचायतीना लाभ होईल अशी कामे प्राधान्यक्रमाने घ्यावयाची आहेत.

जिल्हा परिषद व पंचायत समिती विकास आराखड्यासाठी पंधराव्या वित्त आयोगाच्या अनुदानाद्वारे मिळणारा निधी , भारत सरकार आणि राज्य सरकारचा सक्रिय सहभाग यामुळे जिल्हा परिषद विकास आराखडा व्यापक पद्धतीने तयार करण्याची आणि समानता व समावेशकतेसह त्यांची गुणवत्ता वाढविण्याची वेळ आली आहे. शिवाय, जिल्हास्तरावर केंद्र व राज्य सरकारच्या विविध योजना व कार्यक्रमांची अंमलबजावणी करणा-या बहुतांश संस्था आहेत. म्हणूनच जिल्हा स्तरावर नियोजनात अभिसरणांना मोठी संधी आहे.

जिल्हा परिषद व पंचायत समिती विकास आराखडा तयार करणे ही ठरवून दिलेल्या कालमर्यादेत पूर्ण करण्याची प्रक्रिया आहे. ती टप्या टप्याने पूर्ण होणाऱ्या साखळी योजनांच्या प्रक्रियेचा एक भाग आहे. ग्रामपंचायतींनी त्यांच्या क्षेत्रातील ग्रामपंचायत विकास आराखडा (GPDP) पूर्ण केल्यानंतर पंचायत समितीने पंचायत समिती विकास आराखडा व त्यानंतर जिल्हा परिषदेने जिल्हा परिषद विकास आराखडा तयार करणे आवश्यक आहे.

याद्दष्टीने शासनाने यापुर्वी शासन निर्णय क्रमांकः ग्रा.वि.वि. बीपीडीपी-२०२१/प्र.क्र. २१/पंरा- ६ दि. १४ जून, २०२१ अन्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित केलेल्या होत्या नव्याने सविस्तर मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याचे शासनाच्या विचाराधिन होते.

**शासन निर्णय -**

शासन निर्णय क्रमांकः ग्रा.वि.वि. बीपीडीपी-२०२१/प्र.क्र. २१/पंरा-६, दि.१४ जून, २०२१ अधिक्रमित करण्यात येत आहे. पंचायत समिती विकास आराखडा व जिल्हा परिषद विकास आराखडा तयार करण्यासाठी खालील प्रमाणे नव्याने मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

१. पंचायत समितीचे विकास आराखडे हे जिल्हा परिषद विकास आराखडा तयार करण्यासाठी जिल्हा परिषद नियोजन समितीस मूलभूत घटक म्हणून उपयुक्त असतील.
२. जिल्हा परिषद व पंचायत समिती विकास आराखडा उपलब्ध स्रोतांनुसार प्राधान्याने लोकांच्या गरजा, मूलभूत सेवा आणि त्यांच्या आकांक्षा यांच्याशी समरस असावा.
३. जिल्हा परिषद व पंचायत समिती विकास आराखडे पंचवार्षिक स्वरुपाचे असावेत आणि अंमलबजावणीसाठी वार्षिक स्वरुपात अनुक्रमे जिल्हा परिषद व पंचायत समिती सभेमध्ये ठरविलेल्या विषयानुरुप प्राधान्याने अंमलात आणावेत.

४. जिल्हा परिषद विकास आराखडा व पंचायत समिती विकास आराखडा तयार करताना १५ व्या वित्त आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार वित्त आयोगाच्या निधीपैकी ६० टक्के बंधित निधी व ४० टक्के अबंधित निधीच्या तरतुदींचे पालन करणे बंधनकारक राहील.

५. पंचायत समिती विकास आराखडा व जिल्हा परिषद विकास आराखडा तयार करताना मिशन अंत्योदय, गाव गरिबी निर्मुलन आराखडा, ई ग्राम मानचित्र , MGNREGA, PMGSY, SECC, MSRLM इत्यादी माहितींच्या आधारे विकासाच्या कमतरतेचा / गरजेचा शोध घ्यावा.

६. आराखड्यातील प्राप्त तरतूद व विकासाच्या कमतरता विचारात घेवून (Gap Anlyasis) त्यानुसार योजनांचा प्राधान्यक्रम निश्चित करावा.

७. केंद्राच्या मार्गदर्शक सूचनांनुसार विविध खात्यांच्या योजनेशी सांगड घालून योजनांचे अभिसरण (Convergence) करण्यात यावे.

८. हा आराखडा दूरदृष्टी ठेवून आदर्शवत व अंमलबजावणी योग्य दीर्घकालीन असावा. पंचायत समिती विकास आराखडा व जिल्हा परिषद विकास आराखडा तयार करण्यासाठी प्रमुख स्त्रोत १५वा वित्त आयोग निधी असल्याने सन २०२१-२२ ते २०२५-२६ या कालावधीचा बृहत आराखडा व दरवर्षीचा वार्षिक विकास आराखडा तयार करावयाचा आहे. सन २०२१-२२ यावर्षाचा आराखडा यापूर्वीच तयार करण्यात आलेला असल्याने सन २०२२-२३ ते २०२५-२६ या चार वर्षांचा बृहत आराखडा आणि सन २०२२-२३ या वर्षाचा वार्षिक विकास आराखडा तयार करावयाचा आहे.

९. पंचायत समितीने व जिल्हा परिषदेने विकास आराखडे तयार करताना चार वर्षाच्या बृहत आराखडयासाठी दरवर्षी अपेक्षीत असलेल्या वित्त आयोगाच्या निधीच्या दुप्पट (२०० टक्के) निधी विचारात घेऊन आराखडा तयार करावा. तसेच वार्षिक आराखडा तयार करताना त्यावर्षी वित्त आयोगाच्या अपेक्षीत असलेल्या निधीच्या १.२० पट (१२० टक्के) निधी विचारात घेऊन वार्षिक आराखडा तयार करावा.

१०. पंचायत समिती व जिल्हा परिषद नियोजन समिती, क्षेत्रीय कार्यकारी गट, जिल्हा परिषद व पंचायत समितीच्या सभांमधून आलेल्या प्राथमिकतांच्या आधारे मानवी संसाधने, पायाभूत सुविधा आणि संस्थात्मक क्षमता वापरून मोठ्या प्रमाणात उपक्रमांची योजना आखून अंमलबजावणी करणे शक्य आहे.

जिल्हा परिषदेने उपक्रमांची आखणी व अंमलबजावणी करताना दोन किंवा त्यापेक्षा जास्त ग्राम पंचायती समाविष्ट आहेत अशी कामे प्राधान्याने घ्यावीत. सर्वसाधारणपणे जिल्हा परिषद विकास आराखडा सर्व ग्रामपंचायतींनी आणि पंचायत समितींनी त्यांचे विकास आराखडे तयार केल्यानंतर करावा.

११. जिल्हा व तालुका विकास आराखडे तयार करण्याच्या प्रक्रियेबाबत मोठ्या प्रमाणात लोकांमध्ये जागरूकता निर्माण करण्यासाठी आणि प्रशासन यंत्रणेच्या मनोवृत्तीमध्ये सकारात्मक बदल घडवून आणण्यासाठी वातावरण निर्मिती करावी.

१२. पंचायत समिती व जिल्हा परिषद विकास आराखड्याच्या (BPDP/DPDP ) नियोजन, अंमलबजावणी आणि देखरेखीकरिता पंचायत समिती व जिल्हा परिषद स्तरावरील पदाधिकारी व अधिकारी/कर्मचारी यांची क्षमता बांधणी करणे तथा त्यांचे प्रशिक्षण आयोजन करून त्यांना प्रशिक्षित करणेसाठी राज्य ग्रामीण विकास संस्था, यशदा, पुणे यांचेमार्फत राज्य स्तरावर व जिल्हा स्तरावर प्रवीण प्रशिक्षक तयार केले आहेत. त्यांच्या मदतीने मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी पुढाकार घेवून आपल्या जिल्ह्यामधील सर्व जिल्हा परिषद व पंचायत समिती विकास आराखड्या ( BPDP/DPDP) शी सबंधित सर्व पदाधिकारी, अधिकारी व कर्मचारी यांचे यशस्वीरीत्या प्रशिक्षण आयोजित करावे.

१३. या मार्गदर्शक सुचनांमधील प्रकरण ३ मध्ये यंत्रणांची भूमिका , कर्तव्ये व जबाबदारी सविस्तर देण्यात आलेली आहे. त्यानुसार पंचायत समिती व जिल्हा परिषद आराखडा तयार करताना सर्व यंत्रणा, अधिकारी व कर्मचारी यांनी त्यांच्यावर सोपविलेली जबाबदारी वेळेवर पार पाडावयाची आहे.

१४. पंचायत समिती व जिल्हा परिषद आराखड्या मध्ये समाविष्ट कामांची अंमलबजावणी करताना महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ मधील तरतुदीनुसार व याबाबत राज्यशासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांनुसार हाती घेतलेल्या कामांना प्रशासकीय मान्यता घ्यावयाची असून संबंधित सक्षम तांत्रिक अधिकारी व यंत्रणेने तांत्रिक मान्यता द्यावयाची आहे.

१५. जिल्हा परिषद , पंचायत समिती व ग्राम पंचायत स्तरावरील विविध विकास कामांच्या अंमलबजावणी संबंधी ई-निविदा विषयी राज्यशासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश/सूचनानुसार कार्यवाही करावी.

१६. मंजूर विकास आराखड्यातील कामे, प्रकल्प व योजना इत्यादींची वेळेत व प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी कालबद्ध वेळापत्रक तयार करून त्याची काटेकोरपणे अंमलबजावणी करणे, त्याचे पर्यवेक्षण व सनियंत्रण करणे हे जिल्हा परिषद व पंचायत समितीचे कर्तव्य व जबाबदारी आहे

१७. जिल्हा परिषद व पंचायत समिती विकास आराखड्यातील कामे, प्रकल्प व योजना पूर्ण करण्यात कोणत्याही परिस्थितीत दिरंगाई होणार नाही याची पुरेपूर दक्षता घ्यावी.

१८. पूर्ण झालेली कामे , प्रकल्प व योजना अंमलबजावणी संदर्भातील माहिती ई-ग्रामस्वराज पोर्टलवर अपलोड करावयाची आहे. त्याचप्रमाणे पूर्ण झालेली कामे, प्रकल्प व योजना यांची सर्व देयके पीएफएमएस प्रणालीव्दारे अदा करावयाची आहेत.

१९. विकास आराखडा अंमलबजावणी करताना स्थानिक लोकांना जास्तीतजास्त रोजगाराच्या संधी निर्माण होतील या गोष्टीचा विचार करावा.

२०. विकास आराखड्यातील कामांची अंमलबजावणी करताना कामांच्या गुणवत्तेशी कोणतीही तडजोड केली जाणार नाही याची पुरेपूर दक्षता घ्यावी.

२१. पंचायत समिती व जिल्हा परिषद विकास आराखडा तयार करण्यासंदर्भात मार्गदर्शक सूचना अनुक्रमे प्रकरण- १ व प्रकरण -२ मध्ये दिलेल्या आहेत. तसेच प्रकरण - ३ मध्ये विविध यंत्रणा, अधिकारी/कमर्चारी यांच्या भूमिका, कर्तव्ये व जबाबदा-या स्पष्ट करण्यात आलेल्या आहेत.

२२. पंचायत समिती व जिल्हा परिषद विकास आराखडे या शासन निर्णया सोबत जोडलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार सर्वांचा सहभाग व गरजेवर आधारित प्राधान्य क्रमाने तयार करावेत . आपले सरकार सेवा केंद्राच्या जिल्हा, तालुका व ग्रामस्तरावरील यंत्रणेशी समन्वय करून आवश्यक ती मदत उपलब्ध करून घ्यावी व केंद्र शासनाने निश्चिती केलेल्या मुदतीमध्ये विकास आराखडे व त्या अनुषंगाने इतर सर्व बाबी ई-ग्राम स्वराज पोर्टलवर अपलोड कराव्यात. सन २०२२-२३ या वर्षाचे ग्रामपंचायत विकास आराखडे दि. ३० नोव्हेंबर, २०२१ पर्यंत आणि पंचायत समिती व जिल्हा परिषद विकास आराखडे दि. ३१ डिसेंबर,२०२१ पर्यंत ई-ग्रामस्वराज पोर्टलवर अपलोड करण्यात यावेत.

२३. याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी केलेल्या कार्यवाहीचे अहवाल राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान व राज्य शासनास वेळोवेळी सादर करावयाचे आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११०११००५२१९२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJESH KUMAR

Digitally signed by RAJESH KUMAR
DN: c=IN, o=ALL INDIA SERVICES, ou=Rural Devlopment, postalCode=400001, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=1e08bc9f719f8ce54a66aed8ed2a521ee2d571facec17b204b286a31e88c58d9, pseudonym=4C68155B8922364B2EBB0896AD34147E9F304749, serialNumber=65054D119A082276260F8A89874FD83D0D6D6A635CF1AEF6E1C9B580CAACC3B0, cn=RAJESH KUMAR
Date: 2021.11.01 15:50:11 +05'30'

**( राजेश कुमार )**
**अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रत,
मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव,
मा. मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव
मा. अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व),
मा. विधान सभा/ विधान परिषद सदस्य (सर्व)
मा. अप्पर मुख्य सचिव (वित्त/ नियोजन)
मा. अप्पर मुख्य सचिव /प्रधान सचिव/ सचिव ( जलसंधारण/ महसूल/ महिला व बा.कल्याण/ आदिवासी विकास/ सामाजिक न्याय/ सार्व. आरोग्य/ पाणी पुरवठा/ सार्वजनिक बांधकाम)
महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे.
विभागीय आयुक्त (सर्व)
जिल्हाधिकारी (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद(सर्व)
सहसचिव/ उपसचिव, ग्राम विकास विभाग (सर्व)

## पंचायत समिती विकास आराखडा व जिल्हा परिषद विकासआराखडा (BPDP/DPDP) तयार करण्याबाबत मार्गदर्शक सूचना

## अनुक्रमणिका

| अ.क्र. | तपशिल |
|---|---|
| २.२ | जिल्हा परिषद नियोजन समिती |
| २.३ | जिल्हा परिषद क्षेत्रिय कार्यकारी गट |
| २.४ | जिल्हा क्षेत्रिय कार्यकारी गटाची रचना |
| २.५ | जिल्हा क्षेत्रिय कार्यकारी गटाची कार्ये |
| २.६ | कार्यकारी गटांच्या अहवलांचे एकत्रीकरण |
| २.७ | जिल्हा परिषद नियोजन समिती आणि क्षेत्रिय कार्यकारी गट यांचे प्रशिक्षण |
| २.८ | जिल्हा परिषद विकास आराखड्यासाठी वातावरण निर्मिती |
| २.९ | ग्रामपंचायत विकास आराखडा व पंचायत समिती विकास आराखडा यांचे एकत्रिकरण करून विकासाच्या गरजा व प्राधान्यक्रम ठरविणे |
| २.१० | परिस्थिती विश्लेषण आणि विकास स्थितीबाबतचा अहवाल |
| २.११ | कृती आयाम |
| २.१२ | जिल्हा परिषद स्तरावर नियोजनासाठी स्त्रोत |
| २.१३ | जिल्हा परिषद विकास आराखडा व अंदाजपत्रक |
| २.१४ | जिल्हा पातळीवर नियोजन करताना लक्ष केंद्रीत करावयाचे क्षेत्र |
| २.१५ | जिल्हा परिषद सभा व राज्य शासनाच्या इतर विभागांचा सहभाग |
| २.१६ | जिल्हा परिषद विकास आराखड्यासाठी कृती संगम/अभिसरण |
| २.१७ | प्रकल्प विकास |
| २.१८ | जिल्हा परिषद विकास आराखड्यास मान्यता |
| २.१९ | जिल्हा परिषद विकास आराखडा छाननी |
| २.२० | आराखडा अंमलबजावणी |
| २.२१ | देखरेख प्रणाली व जिल्हा परिषद विकास आराखड्यामध्ये बदल |
| **प्रकरण ३** | **यंत्रणांच्या भूमिका, कर्तव्ये व जबाबदारी** |
| ३.१ | अधिकारी व कर्मचा-यांची कर्तव्ये व जबाबदारी |
| ३.२ | विविध घटकांच्या भूमिका |
| ३.३ | तंत्रज्ञान, माहीती व तांत्रिक सहाय्य |
| ३.४ | उपकक्रमांचे सनियंत्रण |
| **परिशिष्टे** | |
| १ | आढळून आलेल्या समस्या आणि विकासात्मक पर्यायांचे विश्लेषण |
| २ | परिस्थिती मूल्यांकनाची प्रक्रिया/कार्यपध्दती |
| ३ | पंचायत समिती व जिल्हा परिषद सभेत इतर विभागांच्या प्रतिनिधींनी सादर करावयाच्या सादरीकरणाचा आदर्श नमुना |

| अ.क्र. | तपशिल |
|---|---|
| ४ | प्रकल्प अहवाल नमुना |
| ५ | पंचायत समिती/ जिल्हा परिषद विकास आराखडयाची रचना |
| ६ | पंचायत समिती/ जिल्हा परिषद विकास आराखडा नमुना |
| ७ | माहिती फलक नमुना |
| ८ | ग्रामपंचायत विकास आराखडयांचे एकत्रीकरण |
| ९ | ग्रामपंचायत व पंचायत समिती विकास आराखडयांचे एकत्रीकरण |

## प्रकरण १
## पंचायत समिती विकास आराखडा तयार करणे

**प्रस्तावना**

भारतीय राज्यघटनाअनुच्छेद २४३ जी अन्वये केंद्र, राज्य आणि पंचायतींच्या क्षेत्रात राबविल्या जाणाऱ्या सर्व कार्यक्रमांचे / योजनांचे एकत्रिकरण आणि समालोकन करून आर्थिक विकास आणि सामाजिक न्यायासाठी पंचायत समिती विकास आराखडा (BPDP) तयार करणे आवश्यक आहे.

याशिवाय स्थानिक प्रशासन म्हणून स्थानिक नागरिकांना मूलभूत सेवा पुरविणे आणि त्यांच्या भागातील गरीब व उपेक्षित घटकांच्या सुरक्षिततेकडे लक्ष देणे ही देखील स्थानिक प्रशासन व पंचायत समित्यांची जबाबदारी आहे. उपलब्ध संसाधनांचा कार्यक्षम आणि जबाबदारीने वापर करून सर्वसमावेशक योजनेच्या अंमलबजावणीद्वारेच हे साध्य केले जाऊ शकते व वेगवेगळ्या स्तरावर करण्यात येणाऱ्या कार्याची पुनरावृत्ती टाळता येवू शकते.

१५ व्या वित्त आयोगाने शिफारस केलेल्या अनुदानातून व केंद्र सरकार आणि राज्य सरकारांच्या सक्रियतेमुळे पंचायत समिती विकास आराखडा (BPDP) तयार करण्यास चालना मिळाली असून पंचायत समिती विकास आराखडा सहभागात्मक व सर्वसमावेशक पद्धतीने तयार करण्याची वेळ आलेली आहे.

पंचायत समिती विकास आराखडा तयार करणे ही ठरवून दिलेल्या कालमर्यादेत पूर्ण करण्याची प्रक्रिया आहे. ती टप्पा टप्पाने पूर्ण होणाऱ्या साखळी योजनांच्या प्रक्रियेचा एक भाग आहे. ग्रामपंचायतींनी त्यांच्या क्षेत्रातील ग्रामपंचायत विकास आराखडा (GPDP) पूर्ण केल्यानंतर पंचायत समितीने पंचायत समिती विकास आराखडा तयार करणे आवश्यक आहे.

पंचायत समिती विकास आराखडा दीर्घकालीन स्वरुपाचा सन २०२२-२३ ते सन २०२५-२६ या चार वर्षासाठी तयार करावयाचा असून त्यापैकी एका वर्षामध्ये अंमलबजावणीयोग्य असलेल्या कामाचा अग्रक्रम निश्चित करावयाचा आहे. त्यानुसार सन २०२२-२३ या वर्षाचा वार्षिक आराखडा तयार करावयाचा आहे.

पंचायत समित्यांनी त्यांच्याकडे उपलब्ध असलेले मनुष्यबळ, पायाभूत सुविधा आणि संस्थात्मक क्षमता यांचा विचार करून अंमलबजावणी करण्यायोग्य कामे हाती घ्यावयाची आहेत. अशी कामे हाती घेताना दोन किंवा त्याहून अधिक ग्रामपंचायतीना लाभ होईल अशी कामे प्राधान्यक्रमाने घ्यावीत.

### १.१ पंचायत समिती विकास आराखडा तयार करण्याची प्रक्रिया

पंचायत समिती विकास आराखडा ग्रामपंचायत स्तर ते पंचायत समिती स्तर अशा पद्धतीने निम्नस्तराकडून वरीलस्तराकडे सहभागी, सर्वसमावेशक आणि पारदर्शक प्रक्रियेद्वारे तयार करावयाचा आहे. हे करताना मिशन अंत्योदय योजनेद्वारे उपलब्ध माहिती व प्रत्यक्ष झालेली विकास कामे यांचा तुलनात्मक अभ्यास करून राहिलेल्या त्रुटी दूर करण्यासाठी पंचायत समिती विकास आराखडा तयार

करावयाचा आहे. हा आराखडा तयार केल्याने राष्ट्रीय पातळीवर पूर्ण करावयाची शाश्वत विकासाची उद्दिष्टे व त्यांची गरज या गोष्टी पूर्ण करण्यासाठी योगदान देता येईल.

तालुकास्तरावरील इतर शासकीय कार्यालये आपापल्या विभागाशी संबंधीत विकास कामे जरी स्वत: अंमलबजावणी करीत असले तरी त्यांची विकास कामे, पंचायत समिती विकास आराखडयामध्ये समाविष्ठ करुन घेणे आवश्यक आहे. हा आराखडा तयार करताना शासकीय, शैक्षणिक, तसेच खाजगी क्षेत्रातील तज्ञांच्या कौशल्यांचा वापर करून घेण्याचा प्रामाणिक प्रयत्न करणे आवश्यक आहे.

पंचायत समिती विकास आराखडयाची प्रक्रिया, रचना आणि स्वरूप बहुतांशी ग्रामपंचायत विकास आराखडयाच्या प्रक्रिये प्रमाणेच असेल. ग्रामपंचायत विकास आराखडा (GPDP) ग्रामपंचायत स्तरावर तयार करून मंजूर झाल्यानंतर ग्रामपंचायतीने पंचायत समितीकडे पाठवायचा आहे. तालुक्यातील सर्व ग्रामपंचायतीचे आराखडे प्राप्त झाल्यानंतर संकलन करून जी कामे ग्रामपंचायत स्तरावर अंमलबजावणी करणे शक्य नाही किंवा ज्या कामामुळे दोनपेक्षा अधिक ग्रामपंचायतीना फायदा होणार आहे अशी कामे पंचायत समिती विकास आराखडयात समाविष्ट करावयाची आहेत. पंचायत समिती स्तरावरील उच्च संस्थात्मक क्षमता, तांत्रिक मनुष्यबळ व उपलब्ध साधनसामुग्री याचा विचार करून अशा विविध कामांचा पंचायत समिती विकास आराखड्यामध्ये समावेश करावयचा आहे.

पंचायत समिती विकास आराखडा तयार करण्यासाठी प्रक्रिया पुढील प्रमाणे असेल :

१. पंचायत समिती विकास आराखडयासाठी परस्पर समन्वय आणि आराखडयांच्या प्रक्रियेचे सुलभीकरण यासाठी प्रत्येक पंचायत समितीसाठी पंचायत समिती नियोजन समितीची स्थापना करणे (PSPC).
२. वातावरण निर्मिती व समुदाय एकत्रीकरण
३. प्राथमिक आणि दुय्यम माहिती संकलन आणि एकत्रिकरण
४. परिस्थितीचे विश्लेषण, गरजांचे मूल्यांकन व विकासात्मक दरीचा अभ्यास आणि वस्तुस्थिती दर्शक विकास अहवाल तयार करणे.<परिच्छेद लिहा>
५. दूरदृष्टीचा विचार करुन उदिष्ट निश्चित करणे.<परिच्छेद लिहा>
६. उपलब्ध संसाधने व त्या अनुषंगाने संबंधित उपक्रम निश्चित करणे.
७. गरजांच्या प्राधान्य क्रमानुसार आणि नियोजित उपक्रमांच्या आधारे पंचायत समिती विकास आराखड्याचा मसुदा तयार करणे.
८. पंचायत समिती विकास आराखड्यास मान्यता, अंमलबजावणी, देखरेख आणि झालेल्या बदलाचे विश्लेषण.

## १.२ पंचायत समिती नियोजन समिती (PSPC)

१. पंचायत समितीने नागरिकांचा व्यापक सहभाग, संसाधनांचा अधिकतम उपयोग आणि जास्तीत जास्त विकासात्मक लाभ मिळवून देण्याच्या उद्देशाने पंचायत समिती विकास आराखडा तयार करावा.

२. पंचायत समितीने सर्वसमावेशक व दूरदर्शी आराखडा तयार करण्याच्या हेतु मध्ये सहाय्यकारी होवु शकतील अशा कल्याणकारी / परोपकारी / ऐच्छिक मानवी संसाधनांची मोठया प्रमाणात मदत घेतली पाहिजे. यासाठी “पंचायत समिती नियोजन समिती” (PSPC) गटाची स्थापना पंचायत समिती विकास आराखडा तयार करण्यासाठी करण्यात यावी.

३. पंचायत समिती नियोजन समिती (PSPC) पंचायत समिती विकास आराखडयाची अंमलबजावणी पंचायत समितीच्या सभापतीच्या अध्यक्षतेखाली करेल.

४. ज्याठिकाणी नियोजन प्रक्रियेला मदत करण्यासाठी प्रख्यात तज्ज्ञ उपलब्ध असेल त्या ठिकाणी सदर व्यक्तीस पंचायत समिती नियोजन समिती (PSPC) चे सह-अध्यक्ष म्हणून नामनिर्देशित करता येईल.

५. पंचायत समिती स्तरावरावरील विभाग प्रमुख / क्षेत्रिय विभागांचे प्रतिनिधी पंचायत समिती नियोजन समिती (PSPC) चे सदस्य असणे बंधनकारक आहे.

६. त्यांच्या व्यतिरिक्त, गटातीलनागरिक जे देशात अन्यत्र किंवा परदेशात काम करत आहेत / स्थायिक आहेत, त्यांनाही पंचायत समिती नियोजन समिती (PSPC) सदस्य होण्यासाठी आमंत्रित करता येईल. पंचायत समिती क्षेत्राच्या शाश्वत विकासासाठी त्यांचे ज्ञान / कौशल्य यांचा उपयोग करुन घेणे हा या मागील उद्देश आहे.

७. जिल्हयातील/नजिकच्या इतर जिल्हयामधील / राज्यातील / इतर राज्यांतील गटामधील प्रथितयश लोकप्रतिनिधींना देखील पंचायत समिती नियोजन समिती (PSPC) मध्ये विशेष निमंत्रित म्हणून आमंत्रित करता येईल.

८. या सदस्यांचा मनापासून सक्रिय सहभाग घेता यावा यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी सर्व संबंधित विभागांना आवश्यक त्या सूचना दयाव्यात.

९. पंचायत समिती नियोजन समितीची (PSPC) रचना खालीलप्रमाणेराहील.

**पंचायत समिती नियोजन समितीची रचना**

| क्र. | समिती सदस्य | पद |
|---|---|---|
| १ | पंचायत समिती सभापती | अध्यक्ष |
| २ | पंचायत समिती उप सभापती | उपाध्यक्ष |
| ३ | गट विकास अधिकारी | सदस्य सचिव |
| ४ | तालुक्यातीलएकूण जि.प.सदस्यांपैकी १/५ जि.प.सदस्य (दरवर्षी बदलण्यात येतील) | सदस्य |
| ५ | पंचायत समिती स्तरावरील सर्व खाते प्रमुख | सदस्य |
| ६ | तालुका कृषी अधिकारी | सदस्य |

| क्र. | समिती सदस्य | पद |
|---|---|---|
| ७ | वनपरिक्षेत्र अधिकारी | सदस्य |
| ८ | एमएसआरएलएम चे प्रतिनिधी | सदस्य |
| ९ | तालुक्यातील प्रत्येक जि.प.मतदार संघातून एक सरपंच | सदस्य |
| १० | तालुक्यातील दोन महिला ग्रामसंघाचे अध्यक्ष | सदस्य |
| ११ | कृषी उत्पन्न बाजार समितीचे अध्यक्ष | आमंत्रित |
| १२ | जिल्हा अग्रणी बँक प्रतिनिधी | आमंत्रित |
| १३ | एक स्वच्छता व पर्यावरण तज्ज्ञ | आमंत्रित |

टीप- वरील पैकी अ.क्र. ४, ९, १० व १३ मधील सदस्यांची निवड पंचायती समिती सभापती यांनी नामनिर्देशनाद्वारे करावी. समिती आवश्यकतेनुसार आणखी सदस्यांची निवड करू शकेल. गटातील इतर आमंत्रित सदस्य यांची निवड पंचायत समिती सभापती यांनी नामनिर्देशनाद्वारे करावी. पंचायत समिती नियोजन समितीचा कालावधी पंचायत समिती इतका असेल.

१. ही समिती पंचायत समिती विकास आराखडा तयार करण्याच्या सर्व कामांची पूर्तता करण्यासाठी आणि योजनेच्या प्रभावी अंमलबजावणी व देखरेखीसाठी मदत करणारी पंचायत समिती स्तरावरील अग्रगण्य गट असेल.

२. महाराष्ट्र राज्य ग्रामीण जिवनोन्नती अभियान (MSRLM) चा प्रतिनिधी किंवा कोणत्याही प्रतिष्ठित व्यक्तीस समितीचा फॅसिलीटेटर म्हणून नामनिर्देशित केले जाऊ शकते.

३. फॅसिलीटेटर ग्रामपंचायत विकास आराखडयामधील माहिती आणि मिशन अंत्योदय माहिती (data) एकत्रित करेल आणि ग्राम संसाधन गटाच्या फॅसिलीटेटरर्स आणि क्षेत्रीय कार्यकारी गटाचे संयोजक यांच्याशी समन्वय साधेल.

**१.२.१ पंचायत समिती नियोजन समितीची जबाबदारी :**

१. पंचायत समिती आणि क्षेत्रीय कार्यकारी गट यांना अनुक्रमे पंचायत समिती विकास आराखडा व क्षेत्रीय अहवाल तयार करण्यासाठी मदत करणे.

२. क्षेत्रीय विकासा संदर्भात सकारात्मक विचार विनिमयांस प्रोत्साहित करणे.

३. उपक्रमांच्या तयारीसाठी क्षेत्रीय कार्यकारी गटांना सहाय्य करणे.

४. अतिरिक्त संसाधने एकत्रिकरणाच्या शक्यता पडताळून पाहणे.

५. वेळापत्रकानुसार विविध उपक्रमांची योजना आखतांना योग्य तो समन्वय सुनिश्चित करणे.

६. क्षेत्रीय कार्यकारी गटांच्या उपक्रमांमध्ये समन्वय साधणे.

७. विविध भागधारक, बँका आणि सहकारी संस्थांच्या बैठकांना तसेच चर्चा सत्रांना मदत करणे.

८. पंचायत समिती विकास आराखडा तयार करीत असतांना मदतीसाठी तज्ज्ञ, स्वयंसेवक, तसेच शैक्षणिक - तांत्रिक संस्था यांचा शोध घेऊन त्यांचे सहाय्य घेणे.

९. विविध क्षेत्रीय कार्यकारी गटांनी सादर केलेले अहवाल व त्यांचे एकत्रित अहवालाबाबत समग्र चर्चा करून निधीची उपलब्धता व प्राधान्यक्रम विचारात घेऊन पंचायत समितीचा प्रारूप विकास आराखडा तयार करणे.

१०. पंचायत समिती प्रारूप विकास आराखडा विहित मुदतीत पंचायत समितीच्या सर्वसाधारण सभेकडे अंतिम मान्यतेसाठी सादर करणे.

**१.३ पंचायत समिती क्षेत्रीय कार्यकारी गट**

१.३.१ पंचायत समिती विकास आराखडा तयार करण्यासाठी विविध क्षेत्रांमध्ये असलेल्या कमतरता, त्या क्षेत्रातील गरजा, मिशन अंत्योदय डेटा व विविध विभागांतर्गत वेळोवेळी झालेल्या सर्व्हेक्षणातील माहिती विचारात घेऊन त्या त्या क्षेत्रातील प्राधान्य निश्चित करण्यासाठी खालील विषयांसाठी क्षेत्रीय कार्यकारी गटांची स्थापना करावी.

१. संसाधन विकास व जलसंसाधने
२. आर्थिक विकास व उत्पन्न वाढ, गरिबी निर्मुलन, उपजीविका व कौशल्य विकास
३. शिक्षण
४. महिला व बाल विकास
५. सामाजिक सुरक्षा आणि सामाजिक न्याय
६. कृषी, पक्षुसंवर्धन आणि कृषी संबंधित विभाग
७. आरोग्य
८. पायाभूत सुविधा विकास
९. पर्यावरण आणि हवामान बदल

**१.३.२ पंचायत समिती क्षेत्रीय कार्यकारी गटाची संरचना**

| अ.क्र. | समिती सदस्य | पद |
|---|---|---|
| १ | पंचायत समिती सदस्य | अध्यक्ष |
| २ | विषयाशी संबंधीत पंचायत समिती स्तरावरील खाते प्रमुख/अधिकारी | सदस्य सचिव |
| ३ | विषयांकित क्षेत्रातील कमीत कमी एक तज्ञ | सदस्य |
| ४ | विषयाशी संबंधीत कार्यक्षेत्रामध्ये | सदस्य |

| अ.क्र. | समिती सदस्य | पद |
|---|---|---|
| | तालुक्यातील उत्कृष्ट कार्य केलेल्या दोन ग्रामपंचायतींचे सरपंच | |

प्रत्येक विषयाच्या क्षेत्रीय कार्यकारी गटाची नियुक्ती गट विकास अधिकारी यांनी पंचायत समितीचे सभापती यांचेशी विचार विनिमय करून अंतिम करावी. क्षेत्रीय कार्यकारी गटास नेमून दिलेल्या विषयानुरूप उपक्रमांच्या तयारीसाठी वर नमूद संरचने शिवाय आवश्यकतेनुसार आणखी सदस्यांची आणि/किंवा तज्ञांची निवड क्षेत्रीय कार्यकारी गटाचे अध्यक्ष करू शकतील. त्याचप्रमाणे वरील मुद्दा क्र. १.३.१ मध्ये नमूद केलेल्या विषया व्यतिरिक्त आणखी क्षेत्रीय कार्यकारी गटांची स्थापना पंचायत समितींचे सभापती यांचेशी विचार विनिमय करून करता येऊ शकेल.

**१.३.३ पंचायत समिती क्षेत्रीय कार्यकारी गटाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या.**

१. क्षेत्रीय कार्यकारी गट आपल्या विषयानुरूप दूरदर्शी कार्यक्रम तयार करण्यासाठी आवश्यक असणारी सर्व माहिती गोळा करेल आणि पंचायत समिती स्तरावरील विकासाच्या सद्य:स्थितीचे मूल्यांकन करेल

२. क्षेत्रीय कार्यकारी गट उपलब्ध असलेल्या माहितीचे विश्लेषण करेल व संपूर्ण तालुक्यासाठी सद्य:स्थिती विकास अहवाल तयार करेल. सद्य:स्थिती विकास अहवालात गोळा केलेल्या आकडेवारीच्या आधारे विषयाशी संबंधित परिस्थिती विश्लेषणाचा समावेश असेल व विकासातील अंतर ओळखून गरजेनुसार पूर्ण तालुक्यासाठी दिशा ठरविली जाईल.

३. क्षेत्रीय कार्यकारी गट आपल्या विषयासाठी प्रारूप व्हिजन प्लॅन तयार करेल.

४. क्षेत्रीय कार्यकारी गट आपल्या विषयाचा सद्य:स्थिती विकास अहवाल व आराखडा विहित कालावधीत पंचायत समिती नियोजन समितीकडे सादर करेल.

**१.४. कार्यकारी गटांच्या अहवालांचे एकत्रीकरण:**

विविध क्षेत्रीय स्तरावरील कार्यकारी गटांनी तयार केलेले विकास आराखडे व अहवाल एकत्रीत करून त्यांची छाननी करण्याची जबाबदारी गट विकास अधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली सहा. गट विकास अधिकारी, उपअभियंता (पाणीपुरवठा), सहा. लेखा अधिकारी व शक्यतोवर विस्तार अधिकारी (सांख्यिकी) व विस्तार अधिकारी (सांख्यिकी) नसल्यास विस्तार अधिकारी (पंचायत) यांचा समावेश असलेल्या गटाची राहील. या गटामध्ये आवश्यकते नुसार आणखी अधिका-यांचा समावेश गट विकास

अधिकारी करू शकतील. सदरचा एकत्रीत अहवाल पंचायत समिती नियोजन समितीच्या सभेत सादर करावा.

**१.५ पंचायत समिती नियोजन समिती आणि क्षेत्रीय कार्यकारी गट यांचे प्रशिक्षण.**

पंचायत समिती विकास आराखडा तयार करण्यासाठी समावेशकता, लोकांचा संपूर्ण सहभाग, विविध घटकांच्या प्रक्रिया समजून घेणे, प्राधान्यक्रम निश्चित करणे यासाठी परिस्थिती विश्लेषण करून त्याआधारे प्रकल्प अहवाल तयार करून त्याची अंमलबजावणी करण्यासाठी पंचायत समिती नियोजन समिती आणि क्षेत्रीय कार्यकारी गटाच्या सदस्यांना त्यांच्या भूमिका आणि जबाबदा-या बद्दल प्राथमिक अभिमुखता (तोंड ओळख) प्रशिक्षण देणे आवश्यक आहे.

सदर प्रशिक्षणात खालील बाबींचा समावेश असेल-

१. सर्व लोकप्रतिनिधी, पंचायत समितीचे अधिकारी, तालुका स्तरीय अधिकारी यांचे ज्ञान व कौशल्य वाढविणे

२. भविष्याचा विचार करून दीर्घकालीन व अल्पकालीन कृती आराखडा तयार करण्याची गरज.

३. पंचायत समिती नियोजन समिती आणि क्षेत्रीय कार्यकारी गटाच्या सदस्यांची जबाबदारी आणि भूमिका स्पष्ट करणे.

**१.६ पंचायत समिती विकास आराखडा तयार करण्यासाठी वातावरण निर्मिती**

१. पंचायत समिती आराखडा निर्मितीची अनौपचारिक सुरुवात करण्यापूर्वी लोकनियुक्त प्रतिनिधी, अधिकारी आणि संपूर्ण समुदाय नियोजन प्रक्रियेत सहभागी व्हावा यासाठी वातावरण निर्मिती करणे आवश्यक आहे.

२. यामध्ये प्रामुख्याने समाज आणि प्रशासकीय यंत्रणेच्या मनोवृत्ती व दृष्टीकोनात सकारात्मक बदल होण्यासाठी वातावरण निर्मिती उपक्रमांना महत्त्व देणे आवश्यक आहे.

३. पंचायत समिती विकास आराखडा प्रक्रियेतील पहिले पाऊल म्हणजे ग्रामस्थांमध्ये जनजागृती करून नियोजन प्रक्रियेला सुरुवात करण्यासाठी पंचायत समिती सभेचे आयोजन करणे, पंचायत समिती सभेला पंचायत समिती विकास आराखड्याची गरज, नियोजन प्रक्रियेत राबविले जाणारे उपक्रम, पंचायत समिती नियोजन समिती आणि क्षेत्रीय कार्यकारी गटाची स्थापना आणि त्यांच्या सदस्यांची ओळख इत्यादी विषयांची माहिती देणे.

४. पंचायत समिती नियोजन समितीने योग्य वातावरण निर्मिती आणि महिलांचा व्यापक सहभाग घ्यावयाचा आहे लोकनियुक्त महिला प्रतिनिधी आणि बचत गटांच्या सहकार्याने हे कार्य करता येईल. तालुका पंचायत समिती सभेच्या पूर्वी तालुक्यातील महिला, मुले आणि वयोवृद्ध व्यक्तीं यांच्या स्वतंत्र सभा आयोजित करून त्यांच्या सभेमध्ये त्यांच्याशी संबंधित विषय अंतिम करून पंचायत समिती विकास आराखडा तयार करताना त्याचा समावेश करता येईल.

## १.७ ग्रामपंचायत विकास आराखडे (GPDP) एकत्रित करणे आणि विकासात्मक प्राधान्यक्रम निश्चित करणे.

१. गेल्या पाच वर्षात ग्रामपंचायत विकास आराखडे तयार करताना सर्वसमावेशक प्रक्रियेचा अवलंब करण्यात मोठ्या प्रमाणात यश आले आहे.

२. तालुक्याच्या विकासात्मक गरजा ओळखणे व त्या गरजा पूर्ण करण्यासाठी आवश्यक असणारे उपक्रम निश्चित करणे यासाठी ग्रामपंचायत विकास आराखड्यांचे (GPDP) पंचायत समिती स्तरावर एकत्रीकरण करणे हा एक महत्वपूर्ण घटक आहे.

३. ग्रामपंचायत विकास आराखडामध्ये (GPDP) विकासात्मक गरजा पूर्ण करण्यावर भर देण्याच्या हेतूने जनगणना, सामाजिक, आर्थिक व जातनिहाय जनगणना (एसईसीसी डेटा), मिशन अंत्योदय आणि क्षेत्रीय विभागांद्वारे प्रकाशित डेटा प्लॅनप्लस सॉफ्टवेअरवर (ई-ग्रामस्वराज मध्ये समाविष्ट) उपलब्ध आहे.

४. यादृष्टीने मिशन अंत्योदय डेटा विकासात्मक दरीचे गांभीर्य लक्षात आणून देत असल्याने अत्यंत महत्वपूर्ण आहे. ई-ग्राम स्वराजच्या मदतीने ग्राम पंचायतीनी हाती घेतलेल्या सर्व कामांचे एकत्रिकरण केले जाऊ शकते आणि ग्रामपंचायत विकास आराखड्यात समाविष्ट करता येऊ शकत नाहीत अशा कामांचा समावेश पंचायत समिती विकास आराखड्यात करता येईल. ग्रामपंचायत विकास आराखडयांचे एकत्रीकरण परिशिष्ट-८ मधील नमुन्यात करावे.

५. असे सर्व उपक्रम निश्चित केल्या नंतर विकासात्मक गरजा भागविण्याच्या प्रक्रियेत यापैकी कोणत्या उपक्रमांचा अधिकाधिक उपयोग होऊ शकेल या आधारावर त्यांचा प्राधान्य क्रम निश्चित करता येईल.

६. याबरोबरच एकापेक्षा अधिक ग्रामपंचायतींच्या गरजा भागवू शकणा-या उपक्रमांना प्राधान्य देता येईल.

## १.८ परिस्थिती विश्लेषण आणि सद्य:स्थिती विकास अहवाल

१. परिस्थिती विश्लेषण या प्रक्रियेद्वारे अशा समुदायाच्या समस्या आणि विकासात्मक दरीचे अंतर ओळखणे सोपे होते.

२. हे विश्लेषण तालुका स्तरावर विकासाच्या सद्य:स्थितीचे मूल्यांकन विचारात घेते. प्राथमिकत: विकासाच्या विविध मुद्द्यांवरील विद्यमान परिस्थितीचे मूल्यांकन करणे आवश्यक आहे.

३. यामुळे सद्य:स्थितीत उपलब्ध पायाभूत सुविधा,सुखसोई आणि सेवांमध्ये असलेल्या विकासात्मक दरी बद्दल तसेच भविष्यकालीन विकासासाठी आवश्यक असलेल्या किमान उपक्रमांबद्दल मुलभूत माहिती मिळते.हे विश्लेषण पंचायत समिती विकास आराखड्यामध्ये समाविष्ट करण्याच्या कामांचा प्राधान्यक्रम निश्चितीसाठी आधार म्हणून

काम करू शकते. गेल्या पाच वर्षात वेगवेगळ्या क्षेत्रांत झालेल्या विकासाबाबत प्रमाणित माहिती उपलब्ध असल्यास परिस्थिती विश्लेषण प्रभावी ठरू शकते. असे विश्लेषण पंचायत समिती विकास आराखड्यासाठी भविष्यातील उद्दीष्टे व लक्ष्य निश्चितकरण्यासाठी मानदंड म्हणून काम करेल.

४. माहित झालेल्या समस्यांसाठी परिस्थिती विश्लेषण आणि संबंधित विकासात्मक पर्यायांचे तपशीलवार वर्णन परिशिष्ट १ व २ मध्ये केले गेले आहे.

५. प्रत्येक क्षेत्रीय कार्यकारी गटाने त्यांच्या विषयाचे परिस्थिती विश्लेषण समाविष्ट असलेला क्षेत्रीय अहवाल तयार करावा.

६. या क्षेत्रीय अहवालांमध्ये मागील तीन ते पाच वर्षात केलेल्या प्रगतीचा समावेश असावा. या अहवालात वाटप केलेला आणि वापरला गेलेला निधी, खर्च आणि भौतिक कामगिरी विषयी तपशील असणे आवश्यक आहे.

७. या अहवालामध्ये प्रत्यक्ष माहितीच्या आधारे, यशस्वी प्रकल्प तसेच प्रत्येक क्षेत्रातील यश आणि अपयशा मागील कारणे स्पष्ट केली जाऊ शकतात. लोकांना संबंधित कार्यकारी क्षेत्रातील समुदायाच्या नेमक्या आणि सद्य:स्थितीतील परिस्थितीबाबत अवगत करून देण्यासाठी हा प्रारूप विकास स्थिती अहवाल (डीएसआर) पंचायत समितीपुढे ठेवण्यात यावा.विकास स्थिती अहवाल पंचायत समिती सभेस पुढील बाबींवर लक्ष केंद्रित करण्यास मदत करेल.

- विविध विषयां संबंधीची कामगिरी, मर्यादा व विकासात्मक प्रयत्नांमधील तफावतीच्या अनुषंगाने पंचायत समित्यांच्या विकासाची सद्य:स्थिती.
- विकासात्मक ध्येये साध्य करण्यासाठी अभिसरण रणनीतीचा अवलंब करणे.
- वार्षिक आधारावर पुढील ५ वर्षांसाठी विकासात्मक अजेंड्याचा प्राधान्यक्रम निश्चित करणे.
- पंचायत समितीसह विविध प्राधिकरणे व संस्था यांनी लक्ष देण्यासारखे मुद्दे निश्चित करणे.

### १.९ दूरदृष्टीकोनात्मक अभ्यास

१. गेल्या पाच वर्षात झालेल्या विकासाच्या आधारे तसेच भविष्यातील विकासासाठी समुदायाच्या गरजा व मागण्यांच्या आधारे पंचायत समित्यांनी पुढील पाच वर्षांसाठी दृष्टीकोन ठरविला पाहिजे.

२. समुदायाला पुरविल्या जाणाऱ्या सेवांच्या गुणवत्तेबाबत असलेल्या तक्रारींचे निराकरण करण्याव्यतिरिक्त दूरदृष्टीकोनात्मक अभ्यास, स्थानिक गरजा आणि समुदायाच्या व भागधारकांच्या मागण्या ओळखण्यासाठी व्यासपीठ उपलब्ध करुन देणे.

३. जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियमांतर्गत पंचायत समितीस देण्यात आलेली अनिवार्य कर्तव्ये व जबाबदाऱ्याशी संबंधित मुद्दे ओळखून त्यांच्याकडे लक्ष देण्याची संधीही याद्वारे उपलब्ध होते.

४. परिस्थिती विश्लेषण आणि सद्य:स्थिती विकास अहवाल एकदा पंचायत समिती नियोजन समिती द्वारे अंतिम केल्यावर तो पंचायत समितीसमोर सादर करावा.

५. पंचायत समिती नियोजन समिती द्वारे तयार केलेला प्रारूप दृष्टीकोनात्मक अहवाल देखील या समिती समोर ठेवता येऊ शकेल. जेणेकरून याबाबत मिळणाऱ्या टिप्पण्या व सूचना विचारात घेऊन दृष्टीकोन निश्चिती अंतिम करता येईल.

**पंचायत समित्यांना नियोजन करण्यासाठी उपलब्ध संसाधने १०.१**

ग्रामपंचायती व जिल्हा परिषदा यामधील महत्वाचा दुवा म्हणुन पंचायत समित्या काम करत आहेत. प्रभावी नियोजनाची अंमलबजावणी करण्यासाठी मानव संसाधनाच्या दृष्टीने पुरेशा प्रमाणात पंचायत समित्या सुसज्ज आहे. तथापि, या अंमलबजावणीच्या दृष्टीने पंचायत समिती स्तरावर उपलब्ध असलेली विविध संसाधने शोधण्याची आवश्यक आहे. सर्वसाधारणपणे ही संसाधने पुढील चार प्रकारांमध्ये वर्गीकृत करता येतील.

१. सामाजिक संसाधने - संस्थात्मक सामर्थ्य, शांतता, सामाजिक सौहार्द / सामाजिक एकता

२. नैसर्गिक संसाधने - जमीन, जंगल, पाणी, हवा आणि सर्व नैसर्गिकरित्या उपलब्ध संसाधने

३. मानव संसाधने -तालुक्यात राहणारे नागरिक तसेच बचतगटातीलमहिला, स्वयंसेवीसंस्था, आणि समुदाय आधारित संस्था (CBO) यांसारख्या कोणत्याही क्षेत्रातील व्यक्ती.

४. आर्थिक संसाधने - केंद्र आणि राज्य सरकारांकडून उपलब्ध निधी, स्वउत्पनाच्या बाबी (ओएसआर), लोकसहभागाद्वारे मिळणारे अनुदान. इ.

५. पंचायत समितींचे स्वउत्पन्न - पंचायत समितींचे स्वउत्पन्न अत्यंल्प आहे. व हे मुख्यत: पंचायत समितीच्या अखत्यारितील इमारती आणि इतर मालमत्तांकडून मिळणा-या भाडेशुल्काद्वारे प्राप्त होते. पंचायत समितीच्या उत्पन्नाच्या बाबींमध्ये पुढील गोष्टींचा समावेश होऊ शकतो.

    १. १५ वा वित्त आयोग अनुदान
    २. राज्य वित्त आयोग अनुदान
    ३. स्वउत्पन्नाच्या बाबी (पंचायत समिती सेस निधी)
    ४. केंद्र पुरस्कृत योजना आणि पंचायत समित्यांना राज्य शासनाद्वारे वर्ग करण्यात आलेल्या योजना.

५. राज्य शासनाच्या विविध विभागांचा सहभाग आणि केद्र व राज्य शासनाच्या विविध योजनांचे अभिसरण.

६. लोक सहभाग (रोख, श्रमदान,देणगी इ.)

७. सी.एस.आर. फंड (CSR fund)

**१.११ पंचायत समिती विकास आराखडा व अंदाजपत्रक**

पंचायत समिती विकास आराखडा तयार करताना पंचायत समितीने त्यांच्या स्व: उत्पन्नाचे (सेसफंड) अंदाज पत्रक जि.प व प.स अधिनियम १९६१ मधील तरतुदीनुसार तयार करून अंदाजपत्रकामध्ये विकास कामासाठी उपलब्ध होणा-या निधीचा विचार पंचायत समिती विकास आराखडा तयार करताना करावयाचा आहे. पंचायत समितीस नियोजनासाठी विविध स्त्रोतांतून दरवर्षी उपलब्ध होणारा निधी विचारात घेऊन त्यानुसार चार वर्षांचा बृहत आराखडा व एका वर्षाचा वार्षिक आराखडा तयार करावयाचा आहे.

पंचायत समितीस नियोजनासाठी उपलब्ध होणा-या निधीपैकी १५ व्या वित्त आयोगा अंतर्गत वर्ष निहाय उपलब्ध होणारा निधीचा तपशील राज्य शासनाने यापूर्वीच सर्व पंचायत समितींना कळविलेला आहे. पंचायत समितीने पंचायत समिती विकास आराखडा तयार करताना चार वर्षाच्या बृहत आराखडयासाठी दरवर्षी अपेक्षीत असलेल्या वित्त आयोगाच्या निधीच्या दुप्पट (२००टक्के) निधी विचारात घेऊन आराखडा तयार करावा. तसेच वार्षिक आराखडा तयार करताना त्या वर्षी वित्त आयोगाच्या अपेक्षीत असलेल्या निधीच्या १.२ पट (१२० टक्के) निधी विचारात घेऊन वार्षिक आराखडा तयार करावा.

**१.१२ तालुका स्तरावरील नियोजनाची महत्वाकांक्षी क्षेत्रे**

१. सर्वसमावेशक आणि सहभागी योजनेच्या माध्यमातून पायाभूत सुविधांच्या विकासासह आर्थिक आणि सामाजिक विकासाची कार्ये हाती घेण्याची जबाबदारीही पंचायत समितीवर आहे.

२. तसेच घटनेच्या ७३ व्या घटनादुरुस्ती मधील ११ व्या परिशिष्टामध्ये सूचीबद्ध केलेल्या २९ विषयांतर्गत हाती घेतल्या जाणाऱ्या उपक्रमांबाबत विविध क्षेत्रीय विभागांशी समन्वय साधणे आणि त्यांना सहकार्य करणे पंचायत समितीला आवश्यक असते.

३. विकासाची फळे अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, महिला, मुले आणि इतर दुर्बल आणि उपेक्षित गटांपर्यंत पोहोचतील याची खात्री पंचायत समितीने करणे आवश्यक आहे. अशा महत्वाकांक्षी क्षेत्रात तालुकास्तरावर केली जाऊ शकणारी कार्ये शोधण्याची आवश्यकता आहे.

४. त्याचप्रमाणे मानव विकास निर्देशांक, सयुक्त राष्ट्रसंघाने निश्चित केलेली शाश्वत विकासाची ध्येये, राज्य व केंद्र शासनाच्या प्राधान्याची क्षेत्रे या बाबी पंचायत समितीने विकास आराखडा तयार करताना विचारात घेणे आवश्यक आहे.

५. पंचायत समिती क्षेत्रातील व पंचायत समितीच्या ताब्यातील विविध प्रकारच्या मालमत्तेची देखभाल व दुरुस्ती.

**१.१२.१** उत्पन्न वाढ आणि आर्थिक विकास

सकारात्मक व धोरणात्मक वातावरणाद्वारे साकार करता येऊ शकणारा आर्थिक विकास आणि सामाजिक न्याय यासाठीचे नियोजन पंचायत समित्या व जिल्हा परिषदांकडे असलेल्या पुरेश्या संसाधनाच्या सहाय्याने करण्याची संवैधानिक जबाबदारी त्या त्या पंचायतींवर आहे.

अ. ग्रामपंचायतीकडून संदर्भित कार्याव्यतिरिक्त, इतर कार्ये उच्चस्तरीय संस्थात्मक आणि तांत्रिक कार्यक्षमतेमुळे तालुका स्तरावर राबवली जाणार आहेत. पंचायत समितीने संपूर्ण तालुक्याचा आर्थिक विकास होईल अशा कार्यांवर भर दिला पाहिजे आणि आपल्या कार्यक्षेत्रातील लोकांसाठी रोजगार निर्मिती केली पाहिजे.

ब. ग्रामपंचायतीची आर्थिक विकासाची आणि उत्पन्न निर्मितीची क्षमता मर्यादित असल्याने पंचायत समितीने या क्षेत्रास उच्च प्राधान्य देणे आवश्यक आहे.आर्थिक विकास आणि उत्पन्न निर्मितीचे काही उपक्रम खालीलप्रमाणे आहेत.

१. कृषी संबधित आणि कृषी-प्रक्रिया युनिट्स
२. पुरवठा साखळी व्यवस्थापन मजबूत करणे
३. नाशवंत उत्पादनांसाठी शीतकरण गृह साखळीचा विकास
४. ग्रामीण मार्केट हबसाठी पुढाकार
५. मजबूत पंचायत-खासगी भागीदारी विकसित करणे
६. टाकाऊ पासून टिकाऊ (वेस्ट टू वेल्थ)
७. द्वितीय आणि तृतीय क्षेत्रातील उपजीविकेच्या संधींचा प्रचार
८. ग्रामीण उद्योग समूह

**१.१२.२ नैसर्गिक संसाधन व्यवस्थापन**

१. नैसर्गिक स्रोतांच्या विघटनाचा थेट नकारात्मक परिणाम गरीब लोकांच्या रोजीरोटीवर होतो. पंचायत समित्यांनी सर्वसमावेशक, सहभागी, गरीबाभिमुख आणि शाश्वत पद्धतीने जल व वन संपत्तीचे संवर्धन, व्यवस्थापन आणि वापर करण्यासाठी संबंधित समुदाय संस्थांची क्षमता बळकट करणे आवश्यक आहे.

२. नैसर्गिक स्रोतांच्या उपलब्धतेचे मूल्यांकन करण्यासाठी आणि चांगल्या रोजगाराची गरज लक्षात घेऊन जास्तीत जास्त आर्थिक नफा मिळवण्यासाठी, त्याचा उपयोग सुधारण्यासाठी, आणि शाश्वत आधारावर अन्नाची उपलब्धता सुनिश्चित करण्यासाठी समुदाय संस्थांची क्षमता वाढविण्याची अधिक आवश्यकता आहे.

३. नैसर्गिक संसाधनांच्या व्यवस्थापनासाठी पंचायतींना देण्यात आलेल्या जबाबदाऱ्या व अधिकार पाहता त्या आपापल्या भागातील नैसर्गिक स्त्रोतांचे व्यवस्थापन व संवर्धन करण्यासाठी सर्वात योग्य संस्थात्मक व्यासपीठ म्हणून उदयास आल्या आहेत.

४. समुदाय-आधारित संस्थात्मक चौकटीमध्ये पंचायतींसह कार्य करू शकणारे भिन्न वापरकर्ता गट समाविष्ट करणे देखील आवश्यक आहे. पंचायत समिती त्यांची क्षमता वाढविण्यासाठी संबंधित क्षेत्रीय विभागाशी सहयोग करू शकेल. स्वयंसेवी संस्था आणि समुदाय आधारित संस्था प्रयोग आणि नवकल्पना यांना आधार देऊ शकतात आणि पंचायत आणि वापरकर्ता गट मजबूत करण्यास मदत करू शकतात.

५. संशोधन संस्था आणि संबंधित भागधारकांच्या भागीदारीमुळे चांगल्या पर्यावरणास अनुकूल ग्रामीण भागातील शाश्वत नियोजनास वाव मिळू शकेल .

**१.१२.३ आपत्ती व्यवस्थापन**

१. आपत्तीचे व्यवस्थापन योग्य तयारीवर अवलंबून असते आणि त्यातील बरेच उपक्रम समुदाय स्तरावर हाती घ्यायचे असतात. प्रत्येक ग्रामपंचायतीने कोणत्याही आपत्तीचा परिणाम कमी करण्यासाठी समुदायाच्या सल्ल्यानुसार आपत्ती व्यवस्थापन योजना विकसित करणे आणि शक्य तितकी पूर्व-तयारी करणे आवश्यक आहे..

२. त्या दृष्टीने स्थानिक संस्था आणि समुदायाची क्षमता विकसित करणे हे एक मोठे आव्हान आहे. पंचायत समितींनी अशा प्रकारच्या क्षमता चक्रीवादळे, पूर इत्यादी प्रकारच्या आपत्तीचा जास्त धोका असलेल्या क्षेत्रातील पंचायतीमध्ये निर्माण कराव्यात.

३. योजना तयार करताना, पंचायत समितीने पूर, निवारा, घर बांधणी सारख्या पायाभूत सुविधांच्या निर्मितीसाठी स्त्रोत वाटप करणे आवश्यक आहे. पूरग्रस्त भागात नाविन्यपूर्ण डिझाइनसह योग्य शौचालयास प्राधान्य दिले पाहिजे.

४. आपत्कालीन तयारी आणि आपत्ती निवारण दोन्हीमध्ये, तसेच लोकांचे व्यवहार व संघटन तसेच संबंधित सर्व भागधारकांची क्षमता वाढविणे यामध्ये पंचायत समितीची महत्त्वपूर्ण भूमिका आहे. याव्यतिरिक्त, पंचायत समितीने दीर्घ कालावधीसाठीचा शाश्वत विकास आणि असुरक्षितता कमी करण्याच्या रणनीतीसाठी, हवामान बदल अनुकूलन हस्तक्षेपांसह, आपत्ती जोखीम कमी करण्याच्या क्रियाकलापांना एकीकृत करण्याची आवश्यकता आहे.

५. भविष्यातील जोखीम कमी करण्याच्या रणनीतीसाठी उत्तम पद्धतींचा अवलंब करणे आणि पर्यावरणीय ताण कमी करणे यासाठी आवश्यक उपक्रमांचा पंचायत समिती विकास आराखड्यात समाविष्ट करणे आवश्यक आहे

**१.१२.४ सामाजिक न्यायाची हमी**

१. भारतीय राज्यघटनेच्या अनुच्छेद २४३ जी अन्वये ग्रामीण भागात सामाजिक न्याय मिळावा यासाठी पंचायतींना आदेशित केले आहे. याचा अर्थ असा आहे की असमानता दूर करणे आणि विकासाच्या प्रक्रियेत भाग घेण्यासाठी समाजातील सर्व घटकांना समान संधी प्रदान करणे.

२. सामाजिक न्यायामध्ये सकारात्मक कृती, असुरक्षित लोकांना लक्षित निधीचे वाटप, गरीबाभिमुख सेवा पुरवठा इत्यादींचा समावेश आहे. बऱ्याच सामाजिक सहाय्य कार्यक्रम आणि योजनांच्या अंमलबजावणीसाठी पंचायत समिती जबाबदार आहे.

३. या सेवांचे नियोजन व अंमलबजावणी करताना पंचायतींनी प्रभावी अंमलबजावणी सुनिश्चित केली पाहिजे.पंचायत समिती विकास आराखड्यात समाविष्ट केल्या जाऊ शकणाऱ्या काही प्रमुख बाबी खालीलप्रमाणे आहेत.

   १. अपंग लोकांना शिष्यवृत्ती, भत्ता आणि संधी
   २. अनुसूचित जाती / जमाती आणि इतर उपेक्षित गटांच्या गरजा भागविणे
   ३. सरकारी योजना व कार्यक्रमांची प्रभावी अंमलबजावणी
   ४. सार्वजनिक वितरण व्यवस्थेचे पर्यवेक्षण करणे आणि अन्न सुरक्षा सुनिश्चित करणे
   ५. वृद्धाश्रमांची पायाभूत सुविधा आणि वृद्ध व्यक्तींच्या गरजा भागविणे
   ६. तणावातून होणारे स्थलांतर तपासणे
   ७. महिला आणि मुलांच्या विभिन्न गरजा भागविणे इ.

**१.१२.५ प्राथमिक शिक्षण**

प्राथमिक शिक्षणास प्रोत्साहन देण्यासाठी, निरक्षरता निर्मूलन आणि प्राथमिक शिक्षणाचे सार्वत्रिकीकरण यामध्ये पंचायती महत्वाची भूमिका निभावतात. शालेय शिक्षण व साक्षरता विभागाने २०१८ -१९ पासून केंद्र पुरस्कृत योजना म्हणून समग्र शिक्षा अभियान नावाची शालेय शिक्षणासाठीची एकात्मिक योजना सुरू केली आहे. या अभियानात सर्व शिक्षा अभियान (एसएसए), राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान (आरएमएसए) आणि शिक्षकांचे शिक्षण (टीई) या तीन केंद्र-पुरस्कृत योजनांचा समावेश आहे. यात पंचायत समिती मुख्य भूमिका बजावू शकते. या योजनेच्या जिल्हास्तरीय युनिटसह तालुका स्तरावर आणि जिल्हा पातळीवर कृती करण्यासाठी एकूणच फ्रेमवर्क विकसित करण्यासाठी कार्य करू शकतील. त्या आधारे नियोजन करावे लागेल. पंचायत समितीने शैक्षणिक संस्थांवर समुदायाची मालकी निश्चित करण्यासाठी त्यांच्या संबंधित क्षेत्रातील ग्रामपंचायती व ग्राम शिक्षण समिती यांच्यात चांगला समन्वय सुनिश्चित केला पाहिजे कारण त्या सामाजिक व्यवस्थेचा एक भाग म्हणून कार्यरत आहेत.

शाळेच्या आवारात शौचालय व पिण्याच्या पाण्याची सोय व्हावी यासाठी पंचायत समितीने ग्राम शिक्षण समितीस शालेय विकास आराखडा तयार करताना आवश्यक ते सहकार्य द्यावे. पंचायत

समितीकडून गरजू विद्यार्थ्यांसाठी पायाभूत सुविधा, शिष्यवृत्ती आणि वसतिगृह सुविधांसाठी देखील सहकार्य केले जाऊ शकते.

त्यांनी गावपातळीवरील ग्रामपंचायतींच्या माध्यमातून आपापल्या भागात मध्यान्ह भोजन कार्यक्रमाचे पर्यवेक्षण करण्याची देखील आवश्यकता आहे.

### १.१२.६. आरोग्य

ग्रामीण भागात प्राथमिक आरोग्य सेवेच्या तरतूदी संबंधीची कामे पंचायत राज संस्थांची जबाबदारी आहे. पंचायत समितीने संबंधित विभागातील आरोग्य विभागाच्या सहकार्याने उपकेंद्र, प्राथमिक आरोग्य केंद्रे यासह आवश्यक आरोग्य सेवांच्या सुलभ कामकाजासाठी पुरेशी तरतूद सुनिश्चित करणे आवश्यक आहे.

पंचायत समिती तिच्या योजनांमध्ये पायाभूत सुविधांशी संबंधित उपक्रमांचा समावेश करू शकते. यामध्ये चाचणी प्रयोगशाळेची तपासणी / निदान केंद्रे उघडणे, सीएचसी आणि उपविभागीय रुग्णालयांजवळ रूग्ण / रूग्णांच्या नातेवाईकांसाठी वसतिगृह सुविधा, रुग्णालय परिसरातील सामुदायिक शौचालयाची व्यवस्था, पिण्याच्या पाण्याची सुविधा आणि आरोग्य विभागाच्या सहकार्याने इतर आवश्यक पायाभूत सुविधांचा समावेश असू शकतो. आराखड्यामध्ये समाविष्ट करण्यापूर्वी अशा उपक्रमांबाबत आरोग्य सेवा क्षेत्रांशी संबंधित तज्ज्ञांशी चर्चा करणे आवश्यक आहे.

पंचायत समितीने तिच्या क्षेत्रातील मूलभूत आरोग्य सेवेवर देखरेख ठेवून त्यासंबंधी स्वतःला अवगत ठेवले पाहिजे.पंचायत समितीने तिच्या क्षेत्रातील आरोग्य सेवा विषयक परिस्थितीचा योग्य डेटाबेस राखला पाहिजे आणि सुविधांचा सतत विकास आणि उन्नतीकरण सुनिश्चित केले पाहिजे.

### १.१२.७. मूलभूत सेवा

पंधराव्या वित्त आयोगाकडून राज्यातील सर्व पंचायतराज संस्थांना (जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायत) सन २०२१-२२ ते २०२५-२६ या पाच वर्षामध्ये एकूण रू. २२,७१३ कोटी एवढा निधी उपलब्ध होणार असून त्यापैकी ८० टक्के निधी ग्रा.पं.ना आणि प.स व जि.प यांना प्रत्येकी १० टक्के प्रमाणे निधी उपलब्ध होणार आहे. वित्त आयोगाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार एकूण उपलब्ध होणा-या निधी पैकी ६० टक्के निधी बंधीत स्वरूपाचा असून त्याचा विनियोग पिण्याच्या पाण्याची व्यवस्था व स्वच्छतेसाठी करावयाचा असून उर्वरित ४० टक्के निधी अबंधीत स्वरूपाचा असून त्याचा विनियोग लोकांच्या स्थानिक गरजा भागविणे आणि टिकाऊ सामुहिक मालमत्ता निर्माण करणे व त्यांची कार्यक्षमता सुधारण्यासाठी करावयाचाआहे.

तालुका स्तरावर मूलभूत सेवांचे नियोजन करताना इतर क्षेत्रीय विभागांच्या योजनांना /कार्यक्रमांना त्यादृष्टीने एकत्रित केले जावे आणि स्वच्छता, पाणीपुरवठा, सांडपाणी, घनकचरा व्यवस्थापन, रस्ता, पदपथ, पथदिवे, समुदायातील मालमत्ता या विषयांना पुरेशी प्राथमिकता दिली जावी .

या सेवांचा ७३ व्या घटनेच्या अकराव्या अनुसूचीत सुचीबद्ध २९ विषयांमध्ये तसेच २०३० पर्यंत सध्या करावयाच्या शाश्वत विकासाची ध्येये (एसडीजी) यामध्ये समावेश असल्याने या बाबींना प्राधान्य देण्यात यावे.

**१.१२.८. स्वच्छता**

ग्रामीण भागात अदयापही लोक उघड्यावर शौचास जात असल्यामुळे त्याचा दुर्बल घटकातील विशेषतः महिला आणि मुलांच्या आरोग्यावर दुष्परिणाम होत आहे. स्वच्छ भारत मिशनच्या उदिष्टांमध्ये वैयक्तिक कुटूंबस्तरावर शौचालय व सार्वजनिक शौचालये बांधून उघडयावरील शौचास जाण्याचे निर्मुलन आणि शौचालयाच्या वापरावर भर देण्यात आलेला आहे.

स्वच्छ भारत मिशन - ग्रामीण (एसबीएम-जी) फेज ॥ नुसार हागणदारी मुक्त दर्जा कायम टिकविणे आणि घनकचरा व सांडपाणी व्यवस्थापन यांचा समावेश करण्यात आला आहे. स्वच्छ भारत अभियान एसबीएम (जी) फेज -२ मध्ये मिळणाऱ्या अनुदानाव्यतिरिक्त घनकचरा व सांडपाणी व्यवस्थापनासाठी १५ वा वित्त आयोग, मग्रारोहयो आणि इतर योजने अंतर्गत देण्यात येणाऱ्या निधीतून खर्च करण्यात येणार आहे.

एकंदरीत स्वच्छता हा पंचायत समितीसाठी एक महत्त्वाचा केंद्रबिंदू असून यामध्ये महत्वाची भूमिका पार पाडू शकते म्हणून स्वच्छता विषयक उपक्रमांना पंचायत समिती विकास आराखडयामध्ये ठळकपणे समाविष्ट करणे आवश्यक आहे.

**१.१२.९. पिण्याचे पाणी**

जल-जीवन मिशन (जेजेएम) राज्य सरकारच्या सहकार्याने सुरू करण्यात आले असून पुढील पाच वर्षात खेड्यातील प्रत्येक घरात नियमित आणि दीर्घ मुदतीसाठी विहित गुणवत्तेचे पुरेश्या प्रमाणात पिण्यासाठी पाणी उपलब्ध होईल. मिशन अंतर्गत ग्रामपंचायत आणि तिच्या उप-समितीने गावातील पाणीपुरवठा यंत्रणेचे नियोजन, अंमलबजावणी, व्यवस्थापन, संचालन आणि देखभाल करणे आवश्यक आहे. हा कार्यक्रम पाण्याचा वापर आणि संवर्धनासाठी समुदायावर आधारित पध्दतीसह सांडपाण्याचे व्यवस्थापन, जलसंधारण, रेन वॉटर हार्वेस्टिंग इत्यादीद्वारे पुनर्भरण आणि पुनर्वापर यासारख्या अनिवार्य घटक म्हणून स्त्रोत टिकाव उपाययोजना अंमलात आणू शकेल.

अशा प्रकारे पंचायतीने परिसरातील लोकांना पिण्याच्या पाण्याच्या पुरवठ्यासाठी शाश्वत पायाभूत सुविधा निर्माण करण्याची योजना आखण्याची गरज आहे.

**१.१३. पंचायत समिती नियोजन समिती आणि विविध शासकीय विभागांचा सहभाग**

उद्दीष्ट, उणिवांचे विश्लेषण, प्राप्त संसाधने, प्राथमिक आणि इतर अनुषंगिक माहिती, अनुषंगिक आवश्यक उपक्रमांची निश्चिती संग्रहित केल्यानंतर पंचायत समिती नियोजन समितीची सभा आयोजित करण्यात यावी. या सभेमध्ये सर्व विकासात्मक गरजा व उणीवा यावर चर्चा केली जावी.

सर्व क्षेत्रीय कार्यकारी गटांनी त्यांच्याकडील प्रस्तावित उपक्रम व त्यासाठी आवश्यक अंदाजपत्रकीय तरतूद यांचे सादरीकरण करतील. तसेच विविध शासकीय विभागांचे प्रतिनिधी त्यांच्या विभागाच्या उपक्रमांचे सखोल रचनात्मक सादरीकरण करतील.

विभागामार्फत सादर होणारे रचनात्मक सादरीकरण परिशिष्ट ३ मध्ये देण्यात आलेले आहे. विविध शासकीय विभागांचे प्रतिनिधित्व करणारे अधिकारी सभेपुढे चालू वर्षात विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या उपक्रमांची प्रगती व त्याकरिता खर्च करण्यात आलेला निधी व पुढील वर्षात (ज्या वर्षाकरिता पंचायत समिती विकास आराखडा तयार करावयाचा आहे) यामधील प्रस्तावित उपक्रम व त्याकरिता वाटप करण्यात आलेला निधी यांची माहिती सभे समोर देतील.

महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (उमेद) विभागाचे प्रतिनिधी हे सुद्धा गटातील त्यांच्या विभागाचे उपक्रम व गटाचा दारिद्रय निर्मुलन आराखडा सादर करतील. निवेदनाच्या स्वरुपात जनतेचे जाहीर प्रकटन पंचायत समिती विकास आराखड्यात समाविष्ट करून मान्यतेसाठी संबंधित पंचायत समितीला सादर करतील. क्षेत्रीय कार्यकारी गट विकासाची सद्य:स्थिती व प्रस्तावित उपक्रमाकरीता आवश्यक निधी पंचायत समिती नियोजन समिती सभेसमोर सादर करेल व नियोजन समिती सादर करण्यात आलेल्या विविध सादरीकरणावर जाणीव पूर्वक विचार करेल व आवश्यक सूचना व सल्ला देईल.

**१.१४ क्षेत्रिय विभागांच्या योजना आणि कार्यक्रमांसह अभिसरण**

पंचायत समिती आपली विकास कामे पंचायत स्तरीय विभागांमार्फत राबविते, तसेच इतर तालुकास्तरीय विभागदेखील तालुकास्तरावर स्वतंत्रपणे विविध योजनांची अंमलबजावणी करीत आहेत. त्यामुळे विकास योजना व कार्यक्रमांच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी सर्व विभागांमध्ये परस्पर सामंजस्य व सुसंवाद असणे अत्यंत आवश्यक आहे. म्हणूनच पंचायत समितीने आपला स्वतंत्र दृष्टीकोन न ठेवता सर्व समावेशक दृष्टीकोनातून आराखडा तयार करणे अपेक्षित आहे.

त्यासाठी पंचायत समितीने आपले क्षेत्रीय विभाग आणि इतर यंत्रणा यांचेमध्ये समन्वय साधण्यासाठी पुढाकार घेणे तितकेच महत्वाचे आहे. त्यामुळे विविध योजनांच्या परिस्थितीचे विश्लेषण करून त्यातील त्रुटी विचारात घेवून नियोजन करणे आणि हे सर्व उपक्रम पंचायत समिती विकास आराखडयात समाविष्ट करणे शक्य होईल.

**१.१५ प्रकल्प विकास**

क्षेत्रीय कार्यकारी गटांच्या सल्ल्यानुसार पंचायत समिती नियोजन समितीने प्राधान्य दिलेली कामे एकत्रित केल्यानंतर विविध क्षेत्रिय विभागांचे तांत्रिक अधिकारी व्यवहार्य व कार्यवाही करण्यायोग्य कामांची यादी तयार करतील. पंचायत समितीस नियोजनासाठी उपलब्ध होणारा निधी विचारात घेऊन या कामांपैकी प्राधान्यक्रम कामांचा समावेश करून प्रारूप विकास आराखडा तयार करण्यात येईल. या आराखडयातील प्रत्येक कामाचा / उपक्रमाचा प्रकल्प अहवाल संबंधीत विभागाचे तांत्रिक अधिकारी तयार करतील. प्रकल्प अहवाल नमुना परिशिष्ट-४ मध्ये दिलेला आहे.

हे प्रकल्प शिक्षण, आरोग्य, समाजकल्याण आणि दारिद्रय निर्मुलन यासारख्या क्षेत्रांमध्ये सेवा वितरणात सुधारणा करण्यासाठी आवश्यक कोणत्याही विषयापर्यंत तसेच उपक्रमांपर्यत विस्तारित केले जाऊ शकतात. पंचायत समितीकडे केंद्र आणि राज्य सरकारच्या योजनांशी संबंधित निधीसह उपलब्ध असलेल्या स्त्रोतांसोबत सर्व निश्चीत केलेली कामांची जुळवणी केली जाऊ शकते. यामध्ये क्षेत्रिय विभाग, लोकसहभाग आणि देणगीदारांच्या योगदानाचा समावेश केला जाऊ शकतो.

सर्व कामांचे परिणाम आणि फलनिष्पती स्पष्टपणे माहित असणे देखिल आवश्यक आहे. या सर्व उपक्रमांचा पंचायत समिती विकास आराखडयांमध्ये समावेश करण्यासाठी प्राधान्यक्रम ठरविला जाऊ शकतो. कार्यवाहीस्तव हाती घेतलेल्या प्रत्येक उपक्रमास प्रभावी अंमलबजावणी आणि फलनिष्पती साठी प्रक्षेपित करण्यात यावे.

### १.१६ पंचायत समिती विकास आराखडा निर्मिती व मंजुरी

- पंचायत समिती विकास आराखडा तयार करताना सर्व घटकांशी विचार विनिमय करून हाती घ्यावयाची कामे निश्चित केल्यानंतर आणि प्रत्येक क्षेत्रीय कार्यकारी गटाद्वारे प्रकल्प विकास केल्यानंतर प्रारूप पंचायत समिती विकास आराखडा तयार केला जाईल. हा प्रकल्प आराखडा निश्चित केलेल्या क्षेत्रांसाठी पंचायत समिती नियोजन समितीच्या सभेमध्ये सादर करून त्यावर सविस्तर व साधक बाधक चर्चा केल्यानंतर प्रारूप पंचायत समिती विकास आराखडयास पंचायत समिती नियोजन समिती मान्यता देईल. पंचायत समिती विकास आराखडयाची रचना परिशिष्ट– ५ नुसार असावी.
- हे करताना आराखड्यामध्ये क्षेत्र निहाय योजना आणि क्षेत्रीय विभागांच्या योजनांसह अभिसरण असावे. प्रारूप आराखड्यामध्ये संसाधनाच्या उपलब्धतेबाबत खात्री करणे आणि समाजाच्या सर्व वर्गातील सीमांत आणि असुरक्षित वंचित घटकांच्या उन्नतीसाठी योजनांचा समावेश असल्याची खात्री करणे गरजेचे आहे.
- त्यामुळे क्षेत्रनिहाय आराखडा व संबंधित विभागांकडील योजनांचे अभिसरण करणे शक्य होईल.
- प्रारूप आराखडा तयार झाल्यानंतर तो पंचायत समिती समोर मान्यतेसाठी ठेवण्यापूर्वी त्याची छाननी मुख्य कार्यकारी अधिकारी यांचे अध्यक्षतेखालील समितीमार्फत करण्यात येईल व त्यानंतर पंचायत समिती सभा पंचायत समिती विकास आराखड्यास अंतिम मान्यता देईल. पंचायत समिती विकास आराखडा परिशिष्ट–६ मध्ये दिलेल्या नमुन्यानुसार तयार करावा.
- मान्यता देण्यापूर्वी क्षेत्रीय कार्यकारी गट व सबंधित खातेप्रमुख समिती समोर सविस्तर सादरीकरण आणि उपक्रम निहाय तपशील सादर करतील. त्याआधारे प्रस्तावित आराखड्यावर चर्चा करून आराखडा अंतिम करण्यात येईल.

- या समितीचे इतिवृत्त योग्य प्रकारे नोंदविले जावे, पंचायत समिती सभेमध्ये घेतलेले निर्णय पंचायत समितीच्या सूचना फलकावर व महत्वाच्या दर्शनी भागात विहीत केलेल्या नमुन्यातील माहिती फलक तयार करून प्रसिद्ध करावयाचा आहे.

**१.१७ पंचायत समिती विकास आराखडा छाननी**

पंचायत समिती नियोजन समितीने निश्चित केलेल्या प्रारूप पंचायत समिती विकास आराखडयाची छाननी करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. यांचे अध्यक्षतेखालील समितीकडे सोपविण्यात येत आहे. या समितीमध्ये अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, मुख्य लेखा व वित्त अधिकारी, प्रकल्प संचालक (जल जीवन मिशन) आणि उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) हे अधिकारी असतील. याशिवाय आवश्यकतेनुसार आणखी अधिका-यांचा समावेश मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या मान्यतेने करता येऊ शकेल.

या समितीकडून छाननी केल्यानंतर प्रारूप पंचायत समिती विकास आराखडयास पंचायत समिती सभा अंतिम मान्यता देईल.

**१.१८ आराखडा अंमलबजावणी**

पंचायत समितीच्या सभेमध्ये मंजूर केलेल्या पंचायत समिती विकास आराखड्यातील कामे, प्रकल्प व योजना इत्यादींची वेळेत व प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी कालबद्ध वेळापत्रक तयार करून त्याची काटेकोरपणे अंमलबजावणी करणे, त्याचे पर्यवेक्षण व सनियंत्रण करणे हे पंचायत समितीचे कर्तव्य व जबाबदारी आहे. याबाबत पंचायत समितीने खालील बाबी विचारात घ्याव्यात.

१. पूर्ण झालेली कामे , प्रकल्प व योजना अंमलबजावणी संदर्भातील माहिती ई-ग्राम स्वराज पोर्टलवर अपलोड करावयाची आहे.

२. त्याच प्रमाणे पूर्ण झालेली कामे , प्रकल्प व योजना यांची सर्व देयके पीएफएमएस प्रणालीव्दारे अदा करावयाची आहेत.

३. पंचायत समिती विकास आराखड्यातील कामे, प्रकल्प व योजना पूर्ण करण्यात कोणत्याही परिस्थितीत दिरंगाई होणार नाही याची पुरेपूर दक्षता घ्यावयाची आहे.

४. विकास आराखड्यातील कामांची अंमलबजावणी करताना कामांच्या गुणवत्तेशी कोणतीही तडजोड केली जाणार नाही याची पुरेपूर दक्षता घ्यावयाची आहे. यासाठी आवश्यकतेनुसार गुणवत्ता नियंत्रण कक्ष / पथकांची स्थापना करावी.

५. विकास आराखडा अंमलबजावणी करताना स्थानिक लोकांना जास्तीत जास्त रोजगाराच्या संधी निर्माण होतील या गोष्टीचा विचार करावयाचा आहे.

**१.१९ देखरेख यंत्रणा व पंचायत समिती विकास आराखड्यात बदल**

१. पंचायत समितीने मंजूर पंचायत समिती विकास आराखड्याची अंमलबजावणी होत असल्याची खात्री करणेसाठी तसेच सातत्याने प्रगतीची देखरेख करण्यासाठी पंचायत

समितीकडे उपलब्ध असलेल्या पर्यवेक्षण यंत्रणा आणि इतर सुविधांचा इष्टतम वापर करावा.

२. पंचायत समितीच्या मासिक बैठकीत नियमितपणे प्रगतीचा आढावा घेवून योजना अंमलबजावणीत आलेल्या अडचणी क्षेत्रीय कार्यकारी गटाशी विचार विनिमय करून सोडवाव्यात.

३. पंचायत समिती विकास आराखड्या अंतर्गत घेतलेल्या विविध प्रकल्पांचे विस्तृत मुल्यांकन करण्यासाठी पथक स्थापन करावे व त्यामध्ये क्षेत्रीय विभागांचे प्रतिनिधी, तांत्रिक तज्ज्ञ, बचत गट महासंघातील सदस्य, शैक्षणिक /तांत्रिक संस्थांचे तज्ज्ञ, पंचायत समितीचे पदाधिकारी इत्यादींचा समावेश करता येईल.

४. अंमलबजावणी मधील पारदर्शकता, सहभाग, व्यापक सल्लामसलत आणि उत्तरदायित्व सुनिश्चित करण्यासाठी समुदाय देखरेखीचे काम सामाजिक लेखा परीक्षण समिती करेल. सदर समितीमध्ये १० ते १५ सदस्य असावेत. या समितीमध्ये सर्व घटकांचा समावेश असावा.

५. पंचायत समितीने मंजुर केलेल्या पंचायत समिती विकास आराखडयातील कोणत्याही कामामध्ये मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. यांच्या पूर्व मान्यतेशिवाय बदल करता येणार नाही. त्यासाठी पंचायत समितीने काम बदलाची आवश्यकता व कारणमिमांसा नमूद करून पंचायत समितीच्या ठरावासह प्रस्ताव जि.प. कडे सादर करावा. सदर प्रस्तावाची छाननी व नमूद कारणमिमांसा याबाबत सविस्तर अहवाल उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पं) यांनी मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेकडे सादर करावयाचा आहे.मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी घेतलेला निर्णय अंतिम राहील.

## प्रकरण – २
## जिल्हा परिषद विकास आराखडा

**प्रस्तावना :**

१. पंचायती राज संस्थांमार्फत सहभागी विकेंद्रित नियोजनाला वेग आला असून माहिती आणि संप्रेषण तंत्रज्ञान (आयसीटी) मधील नव कल्पनाद्वारे सन २०१८ पासून व्यापक ग्रामपंचायत विकास आरखड्यासाठी “सबकी योजना सबका विकास” (Peoples Plan Campaign) मोहिमेद्वारे देशभरात विकेंद्रित योजना प्रभावीपणे राबविणे शक्य झाले आहे.

२. ग्राम पातळीपासून जिल्हा पातळीपर्यंत पंचायतींच्या तीन स्तरांवर विकेंद्रित सहभागात्मक नियोजनाच्या रचनेसाठी ही वेळ योग्य आहे.

३. भारतीय राज्यघटनेच्या कलम २४३ जी नुसार जिल्ह्याच्या भौगोलिक क्षेत्रात पंचायत, राज्य व केंद्राचे असे सर्व कार्यक्रम / योजना एकत्रित करून आर्थिक विकास व सामाजिक न्यायासाठी जिल्हा परिषद विकास आराखडा तयार करुन अंमलात आणण्याची आवश्यकता आहे. जिल्हा परिषद पातळीवर सहभागात्मक नियोजन प्रक्रियेस प्रोत्साहित करण्यासाठी राज्य व केंद्र सरकार नेहमीच पुढाकार घेत आहेत.

४. स्थानिक सरकार म्हणून जिल्हा परिषद देखील स्थानिक नागरिकांना मूलभूत सेवा पोहचविणे आणि लोकसंख्येतील गरीब आणि उपेक्षित घटकांच्या असुरक्षिततेची पूर्तता करण्याची जबाबदारी स्वीकारते.

५. उपलब्ध संसाधनांच्या कार्यक्षम आणि योग्य वापराद्वारे आणि त्यांची प्राथमिकता पूर्ण करण्यासाठी संसाधनांचा विस्तार करून केवळ गरजांवर केंद्रित योजनांच्या अंमलबजावणीद्वारे हे साध्य केले जाऊ शकते. याची खात्री देखील करणे आवश्यक आहे की ग्रामपंचायत, पंचायत समिती, जिल्हा परिषद व राज्य शासनाच्या अन्य विभागांमार्फत हाती घेतलेल्या कामांबाबत पुनरावृत्ती होऊ नये.

६. जिल्हा परिषद विकास आराखड्याकरिता पंधराव्या वित्त आयोगाच्या अनुदानाद्वारे भारत सरकार आणि राज्य सरकारच्या सक्रिय सहभागामुळे जिल्हा परिषद विकास आराखडा व्यापक पद्धतीने तयार करण्यास आणि समानता व समावेशकतेसह त्यांची गुणवत्ता वाढविण्यास चालना मिळाली आहे.

७. जिल्हास्तरावर केंद्र व राज्य सरकारच्या विविध योजनांची अंमलबजावणी पंचायत राज संस्था, राज्य शासनाचे विभाग आणि इतर संस्था मार्फत करण्यात येते. त्यामुळे जिल्हा स्तरावर नियोजनात अभिसरणांना मोठी संधी आहे. ग्रामीण भागासाठी जिल्हा परिषद विकास आराखडा तयार करणे ही कालबद्ध प्रक्रिया आहे. ग्रामपंचायत व पंचायत समितीकडून अनुक्रमे

ग्रामपंचायत विकास आरखडा व पंचायत समिती विकास आराखडा पूर्ण झाल्यानंतर जिल्हा परिषद विकास आराखडा तयार केला जावा.

८. पंचायत समितीचे विकास आराखडे हे जिल्हा परिषद विकास आराखडा तयार करण्यासाठी जिल्हा परिषद नियोजन समितीस मुलभूत घटक म्हणुन उपयुक्त असतील. जिल्हा परिषद विकास आराखडा उपलब्ध स्त्रोतांनुसार प्राधान्याने लोकांच्या गरजा, मूलभूत सेवा आणि त्यांच्या आकांक्षा यांच्याशी समरस असावा.

९. हा आराखडा दूरदृष्टी ठेवून आदर्शवत, अंमलबजावणी योग्य व दीर्घकालीन असावा. हा आराखडा पंचवार्षिक स्वरुपाचा असावा आणि अंमलबजावणीसाठी वार्षिक स्वरुपात जिल्हा परिषद सभेमध्ये ठरविलेल्या विषयानुरुप प्राधान्याने अंमलात आणावा.

१०. जिल्हा परिषद सभेमध्ये आलेल्या प्राथमिकतांच्या आधारे मानवी संसाधने, पायाभूत सुविधा आणि संस्थात्मक क्षमता वापरून, ज्यामध्ये दोन किंवा त्यापेक्षा जास्त तालुके/ग्रामपंचायती समाविष्ट आहेत अशा मोठ्या योजना / उपक्रमांची आखणी करून अंमलबजावणी व देखरेख करू शकते. तसेच जिल्हा परिषद एका पंचायत समितीमध्ये देखिल योजना / उपक्रमांची अंमलबजावणी करू शकते. सर्वसाधारणपणे जिल्हा परिषद विकास आराखडा हा सर्व ग्रामपंचायतींनी आणि पंचायत समितींनी आपला विकास आराखडा पूर्ण केल्यानंतर करावयास पाहिजे.

**२.१ जिल्हा परिषद विकास आराखडा प्रक्रिया:**

जिल्हा परिषद विकास आराखडा सहभागी समावेशक आणि पारदर्शक प्रक्रियेद्वारे तयार करावयाचा आहे. मिशन अंत्योदयाच्या सर्वेक्षणात निदर्शनास आलेल्या विकासातील त्रृटींचे संकलन करून जिल्हा परिषद विकास आराखडयात उपाययोजना समाविष्ट कराव्यात. यामध्ये ग्रामपंचायत आणि पंचायत समिती स्तरावर समाविष्ट बाबीची पुनरावृती होऊ नये. अशा प्रकारे जिल्हा परिषद विकास आराखडा गरज आधारित आणि ग्राम व तालुक्यास पुरक होईल तसेच राष्ट्रीय लक्षांक उदा. शाश्वत विकास ध्येये आणि मानव विकास निर्देशांक पूर्ततेसाठी जिल्हा परिषद विकास आराखडे महत्वपूर्ण ठरतील.

जे प्रकल्प / उपक्रम एकापेक्षा जास्त तालुका क्षेत्रात राबवायचे आहेत परंतु तांत्रिक कार्यक्षमतेच्या किंवा संसाधनांच्या अभावामुळे पंचायत समिती विकास आराखडयात समाविष्ट होऊ शकत नाहीत, असे प्रकल्प / उपक्रम जिल्हा परिषद नियोजन समिती कडून समावेश करण्याबाबत विचार केला जाईल.

जिल्हा परिषद विकास आराखडा तयार करण्याची प्रक्रिया खालीलप्रमाणे असेल.

१. ग्रामीण भागासाठी जिल्हा परिषद विकास आराखड्याची संपूर्ण प्रक्रिया पार पाडण्यासाठी आणि पुढे नेण्यासाठी संपूर्ण नियोजन प्रक्रियेचा समन्वय साधण्यासाठी जिल्हा परिषद नियोजन समितीची स्थापना करणे

२. वातावरण निर्मिती आणि समुदाय एकत्रीकरण करणे

३. प्राथमिक आणि दुय्यम महत्वाची माहिती संकलन, परिस्थिती विश्लेषण,गरजा निश्चिती आणि कमतरता ओळखणे तसेच विकास स्थिती अहवाल पृथ:करण करणे

४. उद्धिष्ट निश्चित करण्यासाठी प्राधान्यक्रमांची व उपलब्ध संसाधनांची निवड.

५. योजना विकास, प्राथमिकता आणि प्रकल्प निश्चिती करणे

६. जिल्हा परिषद विकास आराखडा मान्यता, अंमलबजावणी, देखरेख आणि परिणाम विश्लेषण करणे.

## २.२ जिल्हा परिषद नियोजन समिती

प्रत्येक जिल्हा परिषदेने पंचवार्षिक व वार्षिक जिल्हा परिषद विकास आराखडा तयार करणे आवश्यक आहे. त्यासाठी व्यापक सहभाग, संसाधनांचा इष्टतम उपयोग आणि अपेक्षित कमाल विकासात्मक फायदे मोठ्या संख्येने घेणे, विविध क्षेत्रातील सुप्रसिद्ध, परोपकारी, ऐच्छिक व जिल्हा परिषदेला मदत करू शकेल अशा व्यक्तींची मदत घेऊन समग्र व दूरदर्शी अराखडयाचे नियोजन करणे यासाठी जिल्हा परिषद नियोजन समितीची स्थापना करणे आवश्यक आहे.

जिल्हा परिषद अध्यक्षांच्या अध्यक्षतेखाली जिल्हा परिषद नियोजन समिती स्थापन करावयाची असून या समितीचा आकार आणि रचना वेगवेगळी असू शकते. शासनाच्या विविध विभागांतील जिल्हास्तरीय प्रतिनिधी, जिल्हा परिषद स्तरावरील खातेप्रमुख हे या समितीचे कायम सदस्य असले पाहिजेत. शासनाने दिलेल्या सूचना निर्देशान्वये सर्व यंत्रणांचे शासकिय व जिल्हास्तरीय अधिकारी कार्य करतील याची खात्री करणे.

ग्रामीण क्षेत्रात ज्यांचे ज्ञान, कौशल्य याचा उपयोग होईल अशा व्यक्तींना समितीमध्ये घेतले जावे. इतर जिल्हयांमधील, राज्यांमधील अथवा समितीमधील सदस्य अथवा लौकिकप्राप्त नेतृत्व करणाऱ्या व्यक्तींना देखिल जिल्हा परिषद नियोजन समितीमध्ये घेण्यात यावे.

जिल्हा परिषद विकास आराखडा तयार करणे व जिल्हा परिषद सर्वसाधारण सभेमध्ये सादर करणे यासाठी ही समिती प्राधान्याने काम करेल. ही समिती ग्रामपंचायत विकास आराखडे (GPDP), पंचायत समिती विकास आराखडे (BPDP), अंत्योदय सर्वेक्षण व इतर आवश्यक माहिती गोळा करील आणि ग्रामपंचायत व पंचायत समितीला सुविधा देणाऱ्या सर्व संबधितांशी समन्वय ठेवेल. तसेच विविध विभागाचे क्षेत्रिय कार्यकारी गटाशी समन्वय ठेवेल.

### २.२.१. जिल्हा परिषद नियोजन समितीची रचना पुढील प्रमाणे राहिल.

| अ. क्र. | समिती सदस्य | पद |
|---|---|---|
| १ | जिल्हा परिषद अध्यक्ष | अध्यक्ष |
| २ | जिल्हा परिषद उपाध्यक्ष | उपाध्यक्ष |
| ३ | मुख्य कार्यकारी अधिकारी | सदस्य |

| अ. क्र. | समिती सदस्य | पद |
|---|---|---|
| ४ | सर्व क्षेत्रिय कार्यकारी गटांचे अध्यक्ष | सदस्य |
| ५ | दोन जिल्हा परिषद सदस्य (जिल्हा परिषद अध्यक्ष यांचे मान्यतेने) | सदस्य |
| ६ | जिल्ह्यातील सर्व पंचायत समितीत्यांचे सभापती | सदस्य |
| ७ | जिल्ह्यातील प्रत्येक तालुक्यातून एक सरपंच (जिल्हा परिषद अध्यक्ष यांचे मान्यतेने) | सदस्य |
| ८ | जिल्हा नियोजन अधिकारी | सदस्य |
| ९ | विभागीय वन अधिकारी | सदस्य |
| १० | एमएसआरएलएमचे प्रतिनिधी | सदस्य |
| ११ | जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी | सदस्य |
| १२ | कृषी उत्पन्न पणन समितीचे अध्यक्ष | आमंत्रित |
| १३ | जिल्हा अग्रणी बँक व्यवस्थापक | आमंत्रित |
| १४ | एक स्वच्छता तज्ञ | आमंत्रित |
| १५ | एक अर्थशास्त्रचे प्राध्यापक | आमंत्रित |
| १६ | जिल्हा परिषदेचे सर्व खाते प्रमुख | सदस्य |
| १७ | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. | सदस्य सचिव |

समिती अध्यक्षांना आवश्यक वाटल्यास व नियोजनाला पाठिंबा देण्यासाठी राज्य शासनाच्या विभागाचे जिल्हास्तरीय खाते प्रमुख,जिल्ह्यात एखादा प्रख्यात तज्ञ किंवा व्यक्ती उपलब्ध असल्यास,त्यांना समितीमध्ये आमंत्रित करता येऊ शकेल.

जिल्हा परिषद नियोजन समितीचा कार्यकाळ जिल्हा परिषदेच्या कालावधी इतका असेल.

**२.२.२. जिल्हा परिषद नियोजन समितीची कामे**

१. जिल्ह्यातील दीर्घकालीन विकासाचा दृष्टीकोन विकसित करण्यासाठी जिल्हा परिषद आणि क्षेत्रीय कार्यकारी गटांना सहाय्य करणे.

२. सर्व क्षेत्रीय कार्यकारी गटांचे अहवाल विचारात घेऊन प्रारुप जिल्हा परिषद विकास आराखडा तयार करणे.

३. विकास क्षेत्राच्या विकासा संदर्भात निरोगी विचार विनिमयास प्रोत्साहित करणे.

४. प्रकल्प तयार करण्यासाठी क्षेत्रीय कार्यकारी गटांना सहाय्य करणे.

५. अतिरिक्त संसाधन जमा करण्याच्या शक्यतांचा शोध घेणे.

६. वेळापत्रकानुसार उपक्रमाची अमंलबजावणी होईल यासाठी योग्य समन्वय राखणे.

७. क्षेत्रीय कार्यकारी गटांच्या उपक्रमांचे संयोजन करण्यासाठी जिल्हा परिषदेला सहाय्य करणे.

८. प्रकल्प नियोजनासाठी योग्य अभ्यास करणे व जिल्हा परिषदेला अहवाल देणे.

९. भागधारकांना बँक आणि सहकारी संस्थांशी चर्चा करण्यासाठी व्यासपीठ उपलब्ध करुन देणे.

१०. जिल्हा परिषदेच्या नियोजन प्रक्रियेस सहाय्य करण्यासाठी तज्ञ, स्वयंसेवक, शैक्षणिक-तांत्रिक संस्था शोधणे.

**२.३. जिल्हा परिषद क्षेत्रीय कार्यकारी गट:**

जिल्हा परिषद नियोजन समितीकडे विविध विषयासंबधीचे अहवाल व आराखडे विचारार्थ सादर करण्यासाठी त्या त्या विषयातील माहितगार व तज्ञ व्यक्तींचा गट कार्यरत करणे आवश्यक आहे. त्यानुसार खालील विषयांचे क्षेत्रीय कार्यकारी गट स्थापन करावेत. क्षेत्रीय कार्यकारी गटांची यादी सूचक आहे. जिल्हा परिषदेने कोणत्याही विशिष्ट विकास क्षेत्राचा विचार करण्याचा निर्णय घेतल्यास, यापेक्षा अधिक क्षेत्रीय कार्यकारी गट स्थापन केले जाऊ शकतात.

**जिल्हा परिषद मधील क्षेत्रीय कार्यकारी गटांची सूचक यादी**

| अ. क्र. | कार्यकारी गट |
|---|---|
| १ | लोकप्रशासन, वित्त आकडेवारी आणि नोंदी, कारभार सुधारणा |
| २ | प्रक्रिया व विपणन (मत्स्यपालन, रोजगार हमी योजना, मृद व जलसंधारण, पर्यावरण संरक्षण, कृषि उत्पादनांचा साठा) |
| ३ | पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास आणि मत्स्यपालन |
| ४ | आर्थिक विकास आणि उत्पन्न निर्मिती, लहान व सूक्ष्म उद्योग व्यवसाय संस्था इ. |
| ५ | गरीबी निर्मूलन आणि कौशल्य विकास (गृहनिर्माण) |
| ६ | सामाजिक न्याय दिव्यांग, वृद्ध लोक, मुले, ट्रान्सजेंडर इत्यादी |
| ७ | महिला विकास |
| ८ | अनुसूचित जाती व जमातींचा विकास |
| ९ | आरोग्य आणि पोषण |
| १० | पिण्याचे पाणी आणि स्वच्छता |
| ११ | शिक्षण, कला आणि विकास आणि युवा कल्याण |
| १२ | सार्वजनिक कामे (जेसहवीज आणि उ) |

महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ मधील तरतुदीनुसार प्रत्येक जिल्हा परिषदमध्ये स्थायी समिती व खालील विषय समित्या कार्यरत आहेत.

१. जल व्यवस्थापन व स्वच्छता समिती
२. अर्थ समिती
३. बांधकाम समिती
४. कृषी समिती
५. शिक्षण समिती
६. समाज कल्याण समिती
७. आरोग्य समिती
८. महिला व बाल कल्याण समिती
९. पशुसंवर्धन समिती

या विषय समित्याकडील विषय, कार्यक्षेत्र व समित्यांचा अनुभव याचा उच्चतम वापर होण्याच्या दृष्टीने वर नमूद क्षेत्रीय कार्यकारी गटांच्या सूचक यादीतील विषयांशी सांगड घालून , संबधीत विषय त्या त्या विषय समित्यांकडे देण्याबाबतचा निर्णय जिल्हा परिषद अध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी घ्यावा.

**२.४. जिल्हा क्षेत्रीय कार्यकारी गटांची रचना**

जिल्हा क्षेत्रीय कार्यकारी गटांची रचना खालीलप्रमाणे राहिल.

१. विषय समितीचे सभापती - अध्यक्ष
२. विषय समितीचे सभासद - सदस्य
३. कार्यकारी गटांस सोपविलेल्या विषयातील कमीत कमी एक तज्ञ - सदस्य
४. एक पंचायत समिती सदस्य ( सभापती यांचे मान्यतेने) - सदस्य
५. कार्यकारी गटांस सोपविलेल्या विषयामध्ये उत्कृष्ट कार्य केलेला जिल्ह्यातील एक सरपंच (सभापती यांचे मान्यतेने) - सदस्य
६. विषय समितीचे सचिव - सदस्य सचिव

वर नमूद क्षेत्रीय कार्यकारी गटांच्या सूचक यादीतील काही विषय हे सध्या कार्यरत जिल्हा परिषद विषय समित्यांशी संबधित नसल्यास त्यासाठी जिल्हा परिषद अध्यक्ष यांच्या मान्यतेने त्या विषयामध्ये आवड असणा-या जिल्हा परिषद सदस्यास क्षेत्रीय कार्यकारी गटाचे अध्यक्ष करुन इतर सदस्यांची व सदस्य सचिवाची निवड करून गट स्थापन करावा.

## २.५. जिल्हा क्षेत्रीय कार्यकारी गटांची कार्ये

- प्रकल्प नियोजनात लोकसहभाग घेणे.
- लाभार्थी गटाच्या बैठका, बँका किंवा सहकारी संस्थाशी चर्चा, आणि विकास चर्चासत्र आयोजित करणे. अशा चर्चा करण्यासाठी तांत्रिक सहाय्य आणि नेतृत्व प्रदान करणे.
- क्षेत्रीय कार्यकारी गटांच्या विषय क्षेत्राशी संबंधित माहिती एकत्रित करणे, संग्रह करणे आणि त्यांचे विश्लेषण करणे
- प्राथमिक आणि दुय्यम माहिती एकत्रित करून परिस्थितीचे विश्लेषण करणे
- संबंधित विकास क्षेत्राच्या संदर्भात परिस्थितीचे विश्लेषण करून समस्या आणि संधी ओळखणे आणि समस्या सोडवण्याचे प्रस्ताव तयार करणे.
- परिस्थितीच्या विश्लेषणाच्या आधारे, कालबद्ध रीतीने वस्तुस्थितीदर्शक अहवाल तयार करुन तो जिल्हा परिषद नियोजन समितीकडे सादर करणे, प्रत्येक विकास क्षेत्रासमोरील मोठ्या आव्हानांची, विकासामधील विद्यमान तफावत, विकासात सुधारणेच्या शक्यता आणि कार्यनितिची रूपरेषा त्यासाठी आराखडा तयार करणे.
- जिल्हा परिषद सभेसाठी अहवाल तयार करणे आणि आराखडयास आवश्यक माहिती तयार करणे.
- केंद्र सरकार पुरस्कृत विविध योजना, प्रमुख कार्यक्रम, राज्य योजना आणि इतर योजनांसह स्थानिक विकास प्रकल्पांच्या समन्वय आणि अभिसरणा साठी सल्ला देणे.
- कार्यकारी गटाने त्यांना सोपविलेल्या क्षेत्रांमधील आर्थिक आणि तांत्रिकदृष्ट्या शक्य आणि व्यवहार्य प्रकल्पांची तयारी करणे.
- जिल्हा परिषद सभेने मंजूर केलेल्या वार्षिक आराखडयातील उपक्रमांचे प्रकल्प तयार करणे.
- प्रकल्प अंमलबजावणीवर प्रभावीपणे लक्ष ठेवणे.

## २.६. कार्यकारी गटांच्या अहवालांचे एकत्रीकरण:

या नियुक्त केलेल्या सर्व क्षेत्रीय कार्यकारी गटांनी त्यांचे क्षेत्र/ विषय याबाबत तयार केलेल्या अहवालाचे/प्रकल्पांचे एकत्रीकरण व छानणी करण्याची जबाबदारी अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद यांचे अध्यक्षतेखालील समितीकडे सोपविण्यात येत आहे. या समितीमध्ये मुख्य लेखा व वित्त अधिकारी , प्रकल्प संचालक (जल जीवन मिशन) आणि उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( पंचायत) हे अधिकारी असतील. याशिवाय आवश्यकतेनुसार आणखी अधिका-यांचा समावेश मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या मान्यतेने करता येऊ शकेल. सदरचा एकत्रित अहवाल/ आराखडा जिल्हा परिषद नियोजन समितीच्या सभेमध्ये सादर करावा.

## २.७ जिल्हा परिषद नियोजन समिती आणि क्षेत्रिय कार्यकारी गट यांचे प्रशिक्षण:

- जिल्हा परिषद नियोजन समिती स्थापना झाल्यानंतर, जिल्हा परिषद समितीद्वारे बैठकीचे आयोजन केले जावे त्या बैठकीत जिल्हा परिषद नियोजन समिती सदस्य, जिल्हा परिषद सदस्य, क्षेत्रिय कार्यकारी गट सदस्य व संबधित अधिकारी विचार विनिमयात सहभागी होतील.
- त्यांना जिल्हा परिषद नियोजन समितीच्या व क्षेत्रिय कार्यकारी गटाच्या भूमिका व जबाबदारी बाबत सर्वसाधारण कल्पना देण्यात येईल. त्या आधारे, त्यांच्या कामकाजाची एक रणनीती आणि कृती आराखडा तयार करावा लागेल.
- जिल्हा परिषदेच्या एकूण योजनांची रणनीती व प्राथमिकता सविस्तरपणे जाणून घेण्यात येईल. विविध क्षेत्रिय कार्यकारी गट एकमेकांशी समन्वय ठेवून त्याची सर्वसाधारण सभेतील भूमिका निश्चित करतील.
- जिल्हा परिषद विकास आराखडा तयार होणेकरीता लोकांचा स्वंयस्फूर्त सहभागी नियोजनाची प्रक्रिया विविध लाभधारक गटाने समजून घेणे, परिस्थितीचे विश्लेषण करून समस्यांची निश्चिती आणि प्राधान्य क्रम निश्चित करणे, अपेक्षित फल निश्चितीचे आकलन, योग्य अंमलबजावणी इ. बाबी आवश्यक आहे. >
- यासाठी प्रशिक्षण आणि क्षमता वृध्दीसाठी विविध पध्दतीने प्रयत्न करणे आवश्यक आहे.
- जिल्हा परिषद नियोजन समिती सदस्य, क्षेत्रिय कार्यकारी गट सदस्य, शासनाचे विविध विभागाचे अधिकारी/कर्मचारी, विविध पदाधिकारी, तालुकास्तरीय पदाधिकारी, स्थानिक लोकप्रतिनिधी, विविध कार्यगटांचे समन्वयक यांचे व्यावसायिक ज्ञान व कौशल्य वाढविण्यासाठी कृतीशील प्रशिक्षण, स्थळभेटी व व्यावहारीक प्रशिक्षणासाठी आराखडा तयार करावा.
- राष्ट्रीय ग्रामीण विकास संस्था आणि पंचायती राज, हैदराबाद (एनआयआरडी व पीआर) यांच्या मदतीने राज्य ग्रामीण विकास संस्था (यशदा), पुणे व राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान, पुणे यांचे मार्फत प्रशिक्षण कार्यक्रमांचे नियोजन करण्यात येईल.

## २.८ जिल्हा परिषद विकास आराखडयासाठी वातावरण निर्मिती :

- जिल्हा परिषदेने विविध माध्यमांचा वापर करुन जिल्हा परिषद नियोजन प्रक्रियेची प्रसिद्धी करावी. जिल्हा परिषदेने सर्व जिल्हास्तरीय अधिकारी, जिल्ह्यातील विविध संस्था जसे विद्यापीठे, महाविद्यालये, पॉलिटेक्निक इत्यादींची सभा बोलावून या योजना तयार करण्यास सहकार्य करावे अशी विनंती करावी.
- तसेच जिल्हा परिषदेने सेवानिवृत्त व सेवा देणाऱ्या तज्ञांना जिल्हा परिषद विकास आराखडयातील योजनांना पाठिंबा देण्यासाठी व स्वयंसेवा करण्याकरीता आवाहन करावे.

- जिल्हा परिषद नियोजन आराखडयाची आवश्यकता,नियोजन प्रक्रियेसाठी करावयाची कालबद्ध् कार्यवाही, जिल्हा परिषद नियोजन समिती आणि क्षेत्रिय कार्यकारी गटांची स्थापना आणि त्यांच्या सदस्यांची ओळख याबाबत जिल्हा परिषद सभेला माहिती देण्यात यावी
- जिल्हा परिषद नियोजन समितीने योग्य वातावरण निर्मिती आणि महिलांचा व्यापक सहभाग सुनिश्चित करण्यासाठी पुढाकार घ्यावा. महिला प्रभाग सदस्य आणि बचत गटांच्या सहकार्याने हे घेता येईल.
- जिल्हा परिषद सभेमध्ये निर्णय घेण्याच्या प्रक्रियेत सर्व गटातील लोकांना सामील करण्यासाठी, जिल्हा परिषद विकास आराखड्यात सर्व घटकांच्या प्रश्नांची अधिक चांगली दखल घेण्यात यावी.
- समाज आणि प्रशासन यंत्रणेच्या मनोवृत्तीमध्ये बदल घडवून आणण्यासाठी, योग्य दृष्टीकोन देण्यासाठी वातावरण निर्मिती प्रक्रियेला खूप महत्त्व आहे. म्हणूनच, जिल्हा परिषद विकास आराखडा प्रक्रियेतील प्रथम क्रिया म्हणजे मोठ्या प्रमाणात लोकांमध्ये जागरूकता निर्माण करणे.
- उपरोक्त उपाययोजना व्यतिरिक्त, प्रभावी योजना तयार करण्यासाठी, जिल्हा परिषद नियोजन समितीकडून लोकांच्या आकांक्षा निश्चित समजण्याकरीता आणि जिल्ह्याच्या आराखड्यात या अपेक्षा प्रवर्तित होण्याकरीता सर्व भागधारक, निवडून आलेले प्रतिनिधी, स्वयंसहाय्यता बचत गट यांच्यात सकारात्मक वातावरण निर्मिती करण्यात यावी.

**२.९ ग्रामपंचायत विकास आराखडा व पंचायत समिती विकास आराखडा यांचे एकत्रीकरण करून विकासाच्या गरजा व प्राधान्यक्रम ठरविणे :**

१. गेल्या पाच वर्षात ग्रामपंचायत विकास आराखड्याच्या व्यापक प्रक्रियेचा अवलंब करून मोठ्या प्रमाणात सुधारणा झाली आहे. पंचायत समिती विकास आराखडा सन २०२१-२२ पासून पंचायत समित्या तयार करीत आहेत.

२. ग्रामपंचायत व पंचायत समितीच्या नियोजित कृती आराखडयात विकासाच्या गरजा आणि नियोजित उपक्रमांच्या आधारे जिल्हा पातळीवर ग्रामपंचायत व पंचायत समिती विकास आराखडे एकत्रित केले पाहिजेत हे जिल्हा परिषद पातळीवरील एक महत्त्वाचे पाऊल आहे.

३. ग्रामपंचायत विकासात्मक गरजांवर लक्ष केंद्रित करते . जिल्हा स्तरावरील विकासाच्या गरजा लक्षात घेता ग्रामपंचायत विकास आराखडा जिल्हा स्तरावर एकत्रित करणे जेणेकरून ग्रामस्तरीय व तालुकास्तरीय समस्या यातून सोडविल्या जाव्यात.

४. या हेतूसाठी जनगणना, एसईसीसी माहिती , मिशन अंत्योदय सर्वेक्षणाची माहीती, राज्य शासनाचे इतर विभागांद्वारे प्रकाशित केलेली माहीती आणि यापुर्वीचे ग्रामपंचायत

विकास आराखडा सर्वेक्षण इत्यादींची माहिती ई-ग्राम स्वराज्य या वेब पार्टल अपलोड केलेले असल्याने उपलब्ध आहे. त्याचा सुयोग्य वापर करणे आवश्यक आहे.

५. मिशन अंत्योदय सर्वेक्षणातील माहिती विविध क्षेत्रातील त्रुटी/कमतरता/तफावती शोधण्यासाठी अतिशय उपयुक्त आहे.

६. ग्रामपंचायतींनी आणि पंचायत समितीने तयार केलेल्या प्रकल्पांचे क्षेत्रिय कार्यकारी गटाद्वारे विश्लेषण करून, गटास सोपविलेल्या क्षेत्रामधील गरजा, निकड, एकापेक्षा जास्त ग्रामपंचायती किंवा पंचायत समिती समाविष्ठ असलेले प्रकल्प इ. बाबी विचारात घेऊन अहवाल तयार करावा. ग्रामपंचायत व पंचायत समिती विकास आराखडयांचे एकत्रीकरण परिशिष्ट-९ मधील नमुन्यात करावे.

७. विकासात्मक गरजा संबंधित माहिती जीआयएस प्लॅटफॉर्मवर अपलोड केल्यास गरजांचे विश्लेषण सुलभ होते. समस्या कोठे आणि कोणत्या क्षेत्रात आहे हे निश्चितपणे ओळखण्यास आणि कोणत्या गतिविधीमुळे किती गावे आणि लोकांना मदत होईल, हे समजण्यास मदत करेल.

८. केंद्र शासनाच्या पंचायत राज विभागाने यापूर्वीच प्रत्येक ग्रामपंचायतीला नकाशाचे माहीती देणारी ग्राम मानचित्र सुरू केले आहे. अधिक विकासाची क्षेत्रे आणि निर्देशक तसेच पायाभूत सुविधांचा समावेश करण्यासाठी हे वाढविले जाऊ शकते. भुवन पोर्टलचा वापर करता येईल.

## २.१०. परिस्थिती विश्लेषण आणि विकास स्थिती अहवाल

परिस्थिती विश्लेषण म्हणजे जिल्ह्याच्या विकासाच्या स्थितीचे मूल्यांकन होय. मुख्यतः जिल्ह्याच्या विविध विकासाच्या मुद्द्यांवर जिल्ह्यातील परिस्थितीचे परीक्षण करणे आवश्यक आहे. हे पायाभूत सुविधांमधील अंतर, सोयी सुविधा आणि अस्तित्त्वात असलेल्या सेवा तसेच भविष्यातील विकासाच्या संभाव्यतेबद्दल मुलभूत माहिती प्रदान करते. हे विश्लेषण जिल्हा परिषद विकास आराखड्यात समाविष्ट केलेल्या मुद्द्यांसाठी प्राथमिकता निश्चित करण्यासाठी आधार म्हणून काम करू शकते.

परिस्थिती विश्लेषण ही एक प्रक्रिया देखील आहे ज्याद्वारे समुदायाच्या समस्या आणि हस्तक्षेप आवश्यक असलेल्या अंतरांची ओळख दिली जाते. बहुतेक क्षेत्रीय माहिती जिल्हा पातळीवर उपलब्ध आहेत. तसेच, ग्रामपंचायत आणि पंचायत समितीकडून आलेल्या सूचनांचा उपयोग करता येईल. प्रसंगनिष्ठ परिस्थितीचे विश्लेषण करण्यासाठी, दुय्यम माहिती संकलित करणे, त्याचे विश्लेषण करणे आणि दस्तऐवजीकरण करणे आवश्यक आहे.

जिल्ह्याच्या अस्तित्वातील परिस्थिती व विकासाच्या स्थितीचे विश्लेषण करावे लागेल. या विश्लेषणामध्ये भौतिक आणि पर्यावरणीय वैशिष्ठ्ये, मानवी व नैसर्गिक संसाधने, सामाजिक व आर्थिक

स्थिती, प्रत्येक क्षेत्राची स्थिती आणि विद्यमान विकासाचे प्रश्न आणि आव्हाने यांचा थोडक्यात समावेश केला जाईल.

अस्तित्त्वात असलेल्या संस्थांविषयी माहिती, पायाभूत सुविधा आणि सेवांची गुणवत्ता गोळा केली पाहिजे. जिल्ह्यात अस्तित्त्वात असलेल्या मुलभूत सेवा, पायाभूत सुविधा (उदा. पिण्याचे पाणी, स्वच्छता, गटार, रस्त्यांची परिस्थिती, स्वच्छता इ.) मधील उणीवा आणि तफावती बद्दल माहिती गोळा केली जाणे आवश्यक आहे.

प्रत्येक क्षेत्रिय कार्यकारी गटाने एक स्थिती अहवाल तयार केला पाहिजे ज्यामध्ये परिस्थितीत्मक विश्लेषणाचा समावेश असावा. या क्षेत्रीय अहवालांमध्ये मागील तीन ते पाच वर्षांच्या प्रगतीचा समावेश असावा. या अहवालात वाटप आणि वापरला गेलेला निधी, खर्च आणि भौतिक कामगिरी विषयी तपशील असणे आवश्यक आहे. या कालावधीतील वास्तविक कामगिरीवर आधारित, यशस्वी प्रकल्प आणि यशामागील कारणे आणि प्रत्येक क्षेत्रातील अपयशाचे स्पष्टीकरण देण्यात येईल. योजनेच्या कालावधीत स्थानिक स्वराज्य संस्थेत राज्य व केंद्र पुरस्कृत कार्यक्रम, राज्याच्या योजना व इतर विभागांच्या अंमलबजावणीच्या विकास कामांचा तपशील समाविष्ट करून हा भाग प्रभावी केला जाईल.

सामाजिक विकासाच्या बाबतीत आदिवासी जमातीला भूमीपासून विरक्ती, निष्क्रीय दर्जाची जमीन, कौशल्यांचा अभाव, नोकरीच्या संधींचा अभाव आणि सार्वजनिक सेवा आणि सुविधांचा अभाव यासारख्या अडचणींची यादी करुन त्यावर चर्चा केली जाऊ शकते.

आर्थिक विकासाच्या बाबतीत, वाजवी आणि टिकाऊ साध्य करता येणाऱ्या आर्थिक क्षमतेवर लक्ष केंद्रित केले पाहिजे. उदाहरणार्थ, शेती उत्पादन आणि उत्पादकता वाढविणे, मूल्ये वाढवू शकतील अशा बाजाराशी जोडणे इत्यादी मर्यादा मोजता येतील. आर्थिक क्रियाशिलतेचा विस्तार आणि वाढते उत्पन्न ही अशा विश्लेषणाचा मुख्य मुद्दा असावा. मानवी विकासाच्या बाबतीत, उणीवांचे मूल्यांकन करणे आणि त्याकडे लक्ष देणे आवश्यक आहे. उदाहरणार्थ शिक्षणाची किमान पातळी न गाठण्याची कारणे, शिक्षण सोडण्याचे कारण, कुपोषणाची कारणे इ. ओळखणे आवश्यक आहे.परिस्थिती विश्लेषणानंतर प्रत्येक क्षेत्रिय कार्यकारी गट त्यांच्या क्षेत्रासाठी विकास स्थिती आराखडा व अहवाल तयार करेल. मसुद्याचा अहवाल पुढे क्षेत्रीय कार्यकारी गट आणि नियोजन समितीसमोर ठेवण्यात यावा.

क्षेत्रिय कार्यकारी गट उपलब्ध असलेल्या नकाशाच्या विश्लेषणाच्या आधारे स्थानिक परिस्थितीचा विचार करेल. तसेच स्थिती विश्लेषण, पाहणी, माहिती, आवश्यकता, दुय्यम माहिती एकत्र करेल. क्षेत्रिय कार्यकारी गटनिहाय विकास प्रारूप आराखडे यांचे एकत्रीकरण करून जिल्ह्याचा विकास प्रारूप आराखडा तयार करून हा आराखडा जिल्हा परिषद सभेसमोर सादर करणे, जेणेकरून जिल्ह्याच्या विविध क्षेत्रातील विकास स्थितीचे चित्र स्पष्ट होईल.परिस्थिती विश्लेषण आणि विकास स्थिती अहवाल जिल्हा परिषद सभेला खालील बाबी निश्चित करण्यास मदत करेल:

- जिल्ह्याचे विविध क्षेत्रातील विकासाची सद्य:स्थिती, विकासाचे उद्दिष्टे साधण्यासाठी असलेल्या मर्यादा राबवित असलेल्या उपायोजनांमधील त्रुटी
- जिल्ह्याच्या विकासासाठी लक्षांक गाठण्यासाठी अंमलात आणावयाची अभिसरणा संदर्भातील रणनीती
- पुढील पाच वर्षांत वार्षिक संसाधनाच्या आधारावर विकासाच्या अजेंडयांचे प्राधान्यक्रम
- जिल्हा परिषदेसमवेत विविध प्राधिकरण आणि संस्थांकडून करावयाच्या कार्यवाही संबंधातील मुद्दे, विकास स्थिती अहवालाच्या सूचक बाह्यरेखा विचारात घेऊन जिल्हा परिषद नियोजन सभेत विचार विनिमयानंतर प्रारूप आराखडा आणि विकास स्थिती अहवाल मसुदा अंतिम होईल.
- भारताच्या महत्वाकांक्षी जिल्ह्यांमधील निर्देशकांसंदर्भात तयार केलेली माहिती विचारात घेणे उपयुक्त ठरेल, तसेच मुद्द्यांना अधिक विषयाचे ज्ञान स्वरूप सुस्पष्ट होण्यास मदत होईल आणि विविध विषय जिल्हा परिषद विकास आराखडयाद्वारे हाताळण्यास मदत होईल.

### २.११ कृती आयाम (Visioning Exercise)

आर्थिक विकास आणि सामाजिक न्यायाची उद्दिष्टे ठरविण्यासाठी व त्याअनुषंगाने जिल्हा परिषदेचा दृष्टिकोन विकसित होण्यासाठी व्हिजनिंग महत्त्वाची प्रक्रिया आहे. जिल्हा परिषदेला विविध क्षेत्रात पुढील पाच वर्षे आणि त्यापेक्षा दीर्घ कालावधीसाठी परिस्थिती दृष्टिक्षेपात येण्यासाठी व्हिजनिंग करणे आवश्यक आहे. या प्रक्रियेद्वारे नियोजनात वस्तुनिष्ठता येणे आणि लोकांमध्ये मालकीची (सामाजिक दायित्वाची) भूमिका निर्माण करण्यास मदत होते.

दृष्टी दस्तऐवजाद्वारे (Visioning Document) जिल्हा परिषदेची जिल्ह्यातील विकासासंदर्भात सेवेची गुणवत्ता वाढविण्याबाबत प्रतिबद्धता दिसून येते. दृष्टी दस्तऐवजाद्वारे जिल्हा परिषदेला तिचे अग्रक्रम निश्चित करणे आणि येणाऱ्या वर्षात गाठावयाचे प्रगतीचे लक्षांक निश्चित करण्यास मदत होते.

### २.१२ जिल्हा परिषद स्तरावर नियोजनासाठी स्त्रोत :

जिल्हा परिषद स्तरावर जिल्हा परिषद नियोजन समिती मार्फत उपक्रम राबविण्यासाठी आपल्या सर्व संसाधनांचा वापर करावा. म्हणूनच, या मुख्य स्त्रोतांची ओळख पटविणे नियोजन प्रक्रियेचा एक आवश्यक भाग आहे. या स्त्रोतांचे पुढील चार प्रकारांमध्ये वर्गीकरण केले जाऊ शकते.

**अ) सामाजिक संसाधने- संस्थात्मक शक्ती, शांतता, सामाजिक समरसता / सामाजिक एकता,समुदाय**

**ब) नैसर्गिक संसाधने - जमीन, वने, पाणी, हवा आणि सर्व नैसर्गिकरित्या उपलब्ध स्त्रोत संसाधने**

**क) मानव संसाधन- जिल्ह्यात राहणारे लोक, परिसरातील लोक, विविध क्षमताची संलग्न कार्यक्षम लोक, समाजातील विविध घटक, महिला स्वयंसहाय्यता बचत गट इ.**

**ड) आर्थिक संसाधने - जिल्हा परिषद स्तरावर नियोजनासाठी उत्पनाचे स्त्रोत.**

१. १५ वा वित्त आयोग अनुदान

२. राज्य वित्त आयोग अनुदान

३.जिल्हा परिषदेचा स्वनिधी (जिल्हा परिषद सेस निधी)

४. केंद्र व राज्य शासनाकडून उपलब्ध होणारा निधी /अभिसरण निधी

५. सी.एस.आर. फंड (CSR Fund)६. लोकसहभाग (रोख, श्रमदान, देणगी इ.)

एकदा सर्व क्षेत्रांची माहिती गोळा केली की पुढील महत्त्वाचा टप्पा वित्तीय स्त्रोतांची निश्चिती करणे. उपलब्ध आर्थिक संसाधनाची निश्चिती करताना जिल्हा परिषदेच्या अखत्यारीत असलेल्या विविध स्त्रोतांची उपलब्धता गृहित धरावी म्हणूनच जिल्हा परिषद संसाधनाच्या नियोजनात पुढील गोष्टींचा समावेश आहे.

१. स्थानिकासह समुदायाच्या योगदानाद्वारे वित्तपुरवठा करण्याचे अभिनव माध्यम परोपकारी, दानशूर व्यक्ती, एनआरआय, स्वयंसेवी संस्था, औद्योगिक क्षेत्र आणि बँक लिंक प्रकल्प

२. राज्य शासनाच्या विविध विभागांकडून विविध योंजनांकरिता प्राप्त होणाऱ्या निधीचा अभिसरणासाठी वापर.

३. जिल्हा परिषदेला प्रत्यक्ष मिळणारा निधी व अनुदान केंद्र व राज्य शासनाच्या विविध महत्वाकांक्षी योजनाचे अभिसरणाद्वारे प्राप्त होणारा निधी.

४. ग्रामपंचायत व पंचायत समितीच्या जिल्हा परिषदेशी अभिसरण करून विविध योजना साठी प्राप्त होणारा निधी.

५. प्रमुख स्रोत हा १५ व्या वित्त आयोगाचा निधी असेल परंतु १५ व्या वित्त आयोगामधून प्राप्त होणारा निधी वित्त आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांनुसारच वापरावा

६. राज्य शासनाच्या विविध विभागांना मिळणाऱ्या अंदाजपत्रकिय अनुदान योजनांची माहिती जिल्हा परिषदापर्यत पोहचविणे आवश्यक आहे.

## २.१३. जिल्हा परिषद विकास आराखडा व अंदाजपत्रक

जिल्हा परिषद विकास आराखडा तयार करताना जिल्हा परिषदेने त्यांच्या स्व: उत्पन्नाचे (सेस फंड) अंदाजपत्रक जि.प.व पं.स अधिनियम १९६१ मधील तरतुदी नुसार तयार करून अंदाजपत्रकामध्ये विकास कामासाठी विविध क्षेत्रासाठी उपलब्ध होणा-या निधीचा विचार जिल्हा परिषद विकास आराखडा तयार करताना करावयाचा आहे. जिल्हा परिषदेस नियोजनासाठी विविध स्त्रोतातून दरवर्षी उपलब्ध होणारा निधी विचारात घेऊन त्यानुसार चार वर्षाचा बृहत आराखडा व एका वर्षाचा वार्षिक आराखडा तयार करावयाचा आहे.

जिल्हा परिषदेस नियोजनासाठी उपलब्ध होणा-या निधीपैकी १५व्या वित्त आयोगाअंतर्गत वर्ष निहाय उपलब्ध होणारा निधी राज्य शासनाने यापूर्वीच सर्व जिल्हा परिषदांना कळविलेला आहे. जिल्हा परिषदेने जिल्हा परिषद विकास आराखडा तयार करताना चार वर्षाच्या बृहत आराखडयासाठी

दरवर्षी अपेक्षीत असलेल्या वित्त आयोगाच्या निधीच्या दुप्पट (२००टक्के) निधी विचारात घेऊन आराखडा तयार करावा. तसेच वार्षिक आराखडा तयार करताना त्यावर्षी वित्त आयोगाच्या अपेक्षीत असलेल्या निधीच्या १.२ पट (१२० टक्के) निधी विचारात घेऊन वार्षिक आराखडा तयार करावा.

**२.१४. जिल्हा पातळीवर नियोजन करताना लक्ष केंद्रित करावयाचे क्षेत्र:**

- नियोजित दस्तऐवजाला अंतिम रूप दिल्यानंतर जिल्हा परिषदेने लक्ष केंद्रित केलेल्या क्षेत्राला प्राधान्य दिले पाहिजे. १५ व्या वित्त आयोगाने नमूद केलेल्या अनिवार्य बाबींचा देखील विचार केला पाहिजे.
- या व्यतिरिक्त, जिल्हा परिषदेने घटनेच्या कलम २४३ जी अंतर्गत अकराव्या सुचीमध्ये सूचीबद्ध २९ विषयांवर लक्ष केंद्रित केले पाहिजे. आपल्या राज्याने काही विषय पूर्णपणे जिल्हा परिषदेकडे वळविलेली नाहीत. तरीही या क्षेत्रांमधील समन्वय साधून त्यांना विविध उपक्रम सुलभ करता येतील.
- १५ व्या वित्त आयोगाने प्राधान्यक्रम म्हणून ठरविलेल्या स्वच्छता व पाणी या क्षेत्रांव्यतिरिक्त जिल्हा परिषदांनी आर्थिक विकास, मानव विकास, शाश्वत विकासाची ध्येये, सामाजिक न्याय, कृषी, शिक्षण, आरोग्य, महिलांशी संबंधित बाबी, दिव्यांग व असुरक्षित घटक आणि वृद्ध व दुर्बल यावर लक्ष केंद्रित केले पाहिजे.
- जिल्हा परिषदेच्या विविध प्रकारच्या मालमत्तेची देखभाल व दुरुस्ती.
- विकेंद्रित नियोजनामध्ये ग्रामपंचायतींपासून जिल्हा परिषदे पर्यंतचा प्रवास केल्याने आर्थिक विकासाचे कार्य प्रसिध्दिस येईल.
- केंद्र व राज्य सरकारच्या योजनांची अंमलबजावणी करणाऱ्या बऱ्याच यंत्रणा जिल्हा परिषद मुख्यालयाच्या ठिकाणी आहेत म्हणूनच अभिसरण आणि सामूहिक कृती आणि लघू व मध्यम उद्योगास आधार देण्याच्या तसेच विकास आराखड्यास मध्यवर्ती टप्प्यावर आणण्यास मदत होईल.
- ज्या ठिकाणी नैसर्गिक संभाव्यता आहे अशा ठिकाणी ग्रामीण उद्योगाचे केंद्र उभारणे आवश्यक आहे. यासाठी खाजगी क्षेत्राची आणि सामाजिक संस्थांची मदत घ्यावी.
- औद्योगिक केंद्र विशेषतः महिलांना साहाय्यभूत असावे .पाणी पुरवठ्यासाठी मोठ्या योजना, धरणाचे/जलाशयाचे बांधकाम, स्वच्छतेसाठी यंत्राचा वापर, आधुनिक पद्धतीने घनकचरा व सांडपाणी व्यवस्थापन, मृद व जलसंधारण, पर्यावरण संवर्धन इत्यादी बाबी जिल्हा परिषद विकास आराखड्यात समाविष्ट करता येतील.

**२.१५ जिल्हा परिषद सभा व राज्य शासनाच्या विविध शासकीय विभागांचा सहभाग:**

जिल्हा विकास आराखड्यास सहभागात्मक पद्धतीने आकार देण्यासाठी जिल्हा परिषद सभा ही सर्वात महत्वाची बैठक आहे. प्राथमिक व आनुषंगिक माहिती गोळा केल्यानंतर विविध क्षेत्राच्या

विकासातील त्रुटीसंदर्भात विश्लेषण केल्यावर व अर्थ स्त्रोताचा अंदाज निश्चित केल्यावर व्हिजनिंग तसेच इतर अनुषंगिक प्रक्रिया निश्चित केल्यावर बैठकांचे आयोजन करण्यात येईल.

या सभेमध्ये सर्व विकासात्मक गरजा व त्रुटी यावर चर्चा केली जाईल. जिल्हा परिषद नियोजन समिती सर्व सदस्यांना प्रारूप विकास आराखडा अहवालावर सादरीकरण करेल. सर्व क्षेत्रिय कार्यकारी गट अंदाजित बजेटच्या आवश्यकते सह त्यांच्या प्रस्तावित प्रकल्पाचे सादरीकरण करतील.

तसेच, विभागातील जिल्हास्तरीय अधिकारी देखील चालू वर्षात राबविण्यात येणाऱ्या योजनाच्या कामांच्या प्रगती व त्याचबरोबर पुढील वर्षाच्या काळात राबविण्याच्या प्रस्तावित उपक्रमांबाबत जिल्हा परिषद सभेसमोर सादरीकरण करतील. जिल्हा परिषद सभेद्वारे जिल्हा परिषद विकास आराखड्यास मान्यता देण्यात आल्यावर जनतेच्या विकासाबाबत प्रकटीकरणाचे निवेदन हे आराखड्यात समाविष्ट केले जाईल.

विकास आराखडा कार्यात समन्वय साधण्यासाठी नियुक्त केलेल्या अधिकाऱ्यांनी अनुसूचित जाती व जमाती, महिलांसारख्या असुरक्षित घटकासह समुदायांचे प्रतिनिधींचा जिल्हा परिषद सभेमध्ये सक्रीय सहभाग निश्चित करावा. जिल्ह्यातील ग्रामीण भागातील एम.एस.आर.एल.एम.चा प्रतिनिधी आपले उपक्रम आणि गरीबी निवारण योजना सादर करू शकतात.

### २.१६ जिल्हा परिषद विकास आराखडयासाठी कृती संगम /अभिसरण :

- अभिसरण म्हणजे विविध योजनांच्या परिस्थितीचे विश्लेषण करून त्यातील त्रुटी विचारात घेऊन नियोजन करणे. शासनाच्या इतर विभागाच्या योजना आणि कृती कार्यक्रम यांचे जिल्हास्तरावर नियोजन केलेले असते.
- जिल्हा परिषदेने सक्रियपणे या विविध विभागांशी समन्वय साधून जिल्हास्तरावर अभिसरण घडवून आणावे. संयुक्तपणे केलेले विश्लेषण, नियोजन आणि जिल्हा विकास आराखड्यात या प्रकल्पांचा समावेश करून हे शक्य होईल.
- यासाठी विविध यंत्रणांसोबत वारंवार होणारे सुसंवाद आणि समन्वयातून योजनांची प्रभावी अंमलबजावणी शक्य होईल.याचप्रकारे पंचायत समित्यांनी त्यांचे विकास आराखडे सर्वसमावेशक बनवावे पंचायत समितीचे आराखडे व विविध विकास योजनांचे करावयाचे अभिसरण याचा एकत्रित विचार केल्यास लक्षात येईल की जिल्हा विकास आराखड्याचे महत्त्व अनन्यसाधारण आहे.

### २.१७. प्रकल्प विकास:

- प्राधान्यक्रमाने घ्यावयाच्या उपक्रमांचे एकत्रिकरण केल्यानंतर व शासनाच्या इतर विभागांचे तांत्रिक अधिकारी यांच्याशी चर्चा करून जिल्हा परिषद नियोजन समिती करण्यायोग्य व अंमलात आणण्याच्या कामांची यादी तयार करेल. कार्यान्वित करण्यायोग्य कामांचे प्रकल्प क्षेत्रिय कार्यकारी गटाने तयार करावेत. प्रकल्प अहवाल नमुना परिशिष्ट-४ मध्ये दिलेला आहे.

- ➢ क्षेत्रिय कार्यकारी गटाने तयार केलेले प्रकल्प जिल्हा परिषद नियोजन समितीद्धारे सत्यापित केल्यानंतर शेवटी जिल्हा परिषद सभेकडून मंजूर करण्यात येतील. प्रकल्प प्रचलित अधिनियम, शासनाचे आदेश आणि मार्गदर्शक तत्त्वांच्या आधारे तयार केले जातील. शिक्षण, आरोग्य, लोक कल्याण आणि दारिद्रय कमी करणे यासारख्या सेवा पुरवठ्यात सुधारणा करणाऱ्या कोणत्याही विषयाचा व उपक्रमाचा या प्रकल्पांत विस्तार केला जाऊ शकतो.
- ➢ केंद्र आणि राज्य सरकारच्या योजनांच्या निधीसह जिल्हा परिषदेकडे उपलब्ध असलेल्या संसाधनांशी जुळण्याकरीता सर्व कामांचे नकाशे तयार केले जातील.
- ➢ राज्य शासनाच्या इतर विभागांच्या सार्वजनिक आणि देणगीदारांच्या योगदानाची जुळणी करण्याचा प्रयत्न मोठ्या प्रमाणात केला जाऊ शकतो. सर्व कामांसाठी येणारे परीणाम स्पष्टपणे व्यक्त करणे देखील आवश्यक आहे.
- ➢ या उपक्रमांना जिल्हा परिषद विकास आराखडयात समाविष्ट करण्यासाठी प्राधान्य दिले जाऊ शकते.
- ➢ एकापेक्षा जास्त स्थानिक स्वराज्य संस्था एकत्रीतपणे संयुक्त प्रकल्प करू शकतील. संयुक्त प्रकल्प म्हणजे त्यासाठी अनेक स्थानिक स्वराज्य संस्था निधी गुंतवणूक करतील व त्या पैकी एक स्थानिक स्वराज्य संस्था हा प्रकल्प मुख्य भागीदार म्हणून राबवेल.
- ➢ संयुक्त प्रकल्पासाठी सहभागी स्थानिक स्वराज्य संस्थांद्वारा निधीचे निवेदन बनवण्यात येईल. प्रकल्प राबविणाऱ्या स्थानिक स्वराज्य संस्थांनी सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करावा. संयुक्त प्रकल्प अहवाल तयार करण्यापूर्वी जिल्हास्तरावर संबंधीत त्रिस्तरीय स्थानिक स्वराज्य संस्थेचे अध्यक्ष/ सभापती व सचिव यांची जिल्हा परिषद अध्यक्षांनी बैठक आयोजीत करावी.
- ➢ प्रकल्पासाठी निश्चित केलेली कामे आणि जिल्हा परिषदेकडे उपलब्ध निधी यांची सांगड घातली जावी. यामध्ये प्रकल्पासाठी उपलब्ध होवू शकणा-या केंद्र व राज्यस्तरीय योजनांच्या निधीचा देखील विचार करण्यात यावा.
- ➢ शासनाच्या इतर विभागांचा निधी, समुदायाचा निधी व वर्गणीदारांचा निधी याची देखील सांगड घातली जावी.

### २.१८ जिल्हा परिषद विकास आराखड्यास मान्यता:

- जिल्ह्यातील ग्रामपंचायत व पंचायत समिती विकास आराखडे एकत्रीकरणा नंतर, विविध विषयांच्या क्षेत्रिय कार्यकारी गटाकडून प्राप्त झालेल्या अहवालांचे एकत्रीकरणाचे सादरीकरण करून , त्यावर सविस्तर चर्चा झाल्यावर, प्राधान्यक्रम निश्चित करून जिल्हा परिषद नियोजन समिती मध्ये प्रारूप जिल्हा परिषद विकास आराखडा तयार केला

जाईल. जिल्हा परिषद सभेत सविस्तर विचारविनिमय करुन प्रत्येक क्षेत्रिय कार्यकारी गटाद्धारे प्रकल्प तयार करण्यात येईल.

- जिल्हा परिषद नियोजन समितीने त्यांच्या क्षेत्रिय कार्यकारी गटानी तयार केलेल्या प्रकल्पांचा समावेश करुन निश्चित केलेल्या क्षेत्रासाठी प्रारूप विकास आराखडा तयार करावा.
- आराखड्यात क्षेत्रनिहाय योजना आणि राज्य शासनाच्या इतर विभागासह अभिसरण असावे. आराखड्याचा संसाधनांची उपलब्धता आणि सर्व सामाजिक वर्गांच्या, सीमांत आणि असुरक्षित गटांच्या उन्नतीसाठी योजनांचा विचार केला जाईल याची खात्री करण्याची गरज आहे.
- यामुळे सेक्टर आधारित योजना आणि संबंधित राज्य शासनाच्या इतर विभागांसह अभिसरण याची खात्री होईल. प्रारूप आराखडा तयार झाल्यानंतर जिल्हा परिषद सर्वसाधारण सभेसमोर मंजुरीसाठी ठेवण्यापूर्वी त्याची छाननी मुख्य कार्यकारी अधिकारी यांचे अध्यक्षतेखालील समितीमार्फत करण्यात येईल व त्यानंतर ठेवला जाईल. जिल्हा परिषद विकास आरखड्यास जिल्हा परिषद सर्वसाधारण सभेमध्ये अंतिम मान्यता देण्यात येईल. जिल्हा परिषद विकास आराखडा परिशिष्ट-६ मध्ये दिलेल्या नमुन्यानुसार तयार करावा.
- बैठकी दरम्यान जिल्हा परिषद विकास आराखडा आणि प्रकल्पनिहाय बाबीवर सादरीकरण करण्यात यावे आणि प्रस्तावित योजनांवर चर्चा करण्यात यावी जिल्हा परिषद सभेने घेतलेल्या निर्णयाचे जाहीर प्रकटन स्थानिक स्वराज्य संस्थांच्या सूचना फलकावर करण्यात यावे. जिल्हा परिषद विकास आराखडयाची रचना परिशिष्ट-५ नुसार असावी.
- जिल्हा परिषद विकास आराखडयाबाबत प्रत्येक जिल्हा परिषदेमधील सार्वजनिक ठिकाणी १० फुट X २० फुट आकाराचा सार्वजनिक माहिती फलक परिशिष्ट ७ मध्ये दिलेल्या नमुन्यात लावणे आवश्यक आहे.

**२.१९ जिल्हा परिषद विकास आराखडा छाननी**

जिल्हा परिषद नियोजन समितीने निश्चित केलेल्या प्रारूप जिल्हा परिषद विकास आराखडयाची छाननी करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे अध्यक्षतेखालील समितीकडे सोपविण्यात येत आहे. या समितीमध्ये अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, मुख्य लेखा व वित्त अधिकारी, प्रकल्प संचालक (जल जीवन मिशन) आणि उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( ग्रामपंचायत) हे अधिकारी असतील. याशिवाय आवश्यकतेनुसार आणखी अधिका-यांचा समावेश मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या मान्यतेने करता येऊ शकेल.

या समितीकडून छानना केल्यानंतर जिल्हा परिषद विकास आराखडयास जिल्हा परिषद सर्वसाधारण सभा अंतिम मान्यता देईल.

**२.२०. आराखडा अंमलबजावणी**

१. जिल्हा परिषद विकास आराखड्यास जिल्हा परिषदेच्या सर्वसधारण सभेने मंजुरी दिल्यानंतर त्यातील सर्व कामे / उपक्रमांची अंमलबजावणी जिल्हा परिषदे मार्फत करण्यात येईल. त्यासाठी जिल्हा परिषद सध्याची कार्यपध्दती आणि याविषयी शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनानुसार अंमलबजावणी करेल.

२. आराखड्याची अंमलबजावणी करीत असताना, आराखड्यामधील कामांसाठी उपलब्ध होणारा निधी ज्या योजनेचा असेल, त्या योजनेच्या मार्गदर्शक सूचना, निकष व कार्यपध्दती बंधनकारक राहिल.

३. आराखड्याची अंमलबजावणी, काटेकोरपणे, निश्चित केलेल्या वेळापत्रकानुसार होत असल्याबाबत नियमित आढावा मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हा स्तरीय कार्यकारी समिती आणि अध्यक्ष, जिल्हा परिषद यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हा स्तरीय सनियंत्रण समितीने घ्यावयाचा आहे.

४. त्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी जिल्हास्तरावर देखरेख आणि देखभालीसाठी यंत्रणा तयार करावी. अंमलबजावणी मध्ये पारदर्शकता ठेवावी.

५. आराखडा अंमलबजावणी विषयी सर्व माहिती ई-ग्राम स्वराज पोर्टलमध्ये नियमितपणे अपलोड करावी

६. सर्व पेमेंट्स पीएफएमएस प्रणालीव्दारेच करण्याची दक्षता घ्यावी.

**२.२१. देखरेख प्रणाली व जिल्हा परिषद विकास आराखड्यामध्ये बदल:**

१. जिल्हा परिषद सर्वसाधारण सभेच्या मंजूरीनंतर जिल्हा परिषद विकास आराखडा कार्यान्वित होईल. आराखड्याची अंमलबजावणी, प्रगती व कामाच्या गुणवत्तेवर सातत्याने लक्ष ठेवण्यासाठी जिल्हा परिषद व पंचायत समितीच्या मासिक बैठकीत नियमितपणे होणाऱ्या प्रगतीचा आढावा घेण्यात यावा. योजनांच्या अंमलबजावणीत आढळलेल्या अडचणी शक्यतो जिल्हा स्तरावर अध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी सोडवाव्यात.

२. जिल्हा परिषद विकास आराखडा जि.प. सर्वसाधारण सभेने एकदा मंजुर केल्यानंतर आराखड्यातील कोणत्याही कामामध्ये बदल विभागीय आयुक्त यांच्या पूर्व मान्यतेशिवाय करता येणार नाही. जिल्हा परिषद कडून आराखड्यातील कामामध्ये बदलाचे प्रस्ताव प्राप्त झाल्यास उप आयुक्त (विकास) यांनी प्राप्त प्रस्तावांची छाननी करुन, करावयाच्या बदलाची कारणमिमांसा, आवश्यकता व परिणाम इ. बाबत सविस्तर अहवाल घेऊन विभागीय आयुक्त यांना सादर करावा. विभागीय आयुक्त यांनी जिल्हा परिषद ने दिलेली कारणमिमांसा

विचारात घेऊन योग्य तो निर्णय घ्यावा. याबाबत विभागीय आयुक्त यांनी घेतलेला निर्णय अंतिम राहील.

## प्रकरण ३
## यंत्रणांच्या भूमिका, कर्तव्ये व जबाबदारी

### ३.१. अधिकारी व कर्मचा-यांची कर्तव्ये व जबाबदारी

लोकसहभागी नियोजन प्रक्रियेसाठी पंचायतराज संस्थांतील तिन्ही स्तरावरील यंत्रणेवर जबाबदारी असणार आहे. याशिवाय पंचायत समिती व जिल्हा परिषद स्तरावरील क्षेत्रिय कार्यकारी गट, राज्य ग्रामीण विकास यंत्रणा यांचा सहभाग व महत्वाची भूमिका राहणार आहे. त्याचप्रमाणे,आपले सरकार सेवा केंद्र,जीआयएस मॅपिंग, विविध आज्ञावलींच्या आधारे राज्य, विभाग, जिल्हा व तालुकास्तरावर प्रभावीपणे सनियंत्रणाची व्यवस्था केली जाणार आहे. यासाठी विविध स्तरावरील अधिकारी, कर्मचारी व इतर घटकांची कर्तव्ये व जबाबदा-या खालीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | अधिकारी /कर्मचारी घटक | कर्तव्ये व जबाबदारी |
|---|---|---|
| १ | राज्यस्तर- राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्ष | संपुर्ण उपक्रमाचे नियोजन, सनियंत्रण, पर्यवेक्षण, वेळोवेळी निर्माण होणा-या परिस्थिती बाबत मार्गदर्शन. |
| २ | राज्यस्तर- राज्य ग्रामीण विकास संस्था | राज्यस्तरीय प्रमुख प्रविण प्रशिक्षकांचे प्रशिक्षण, राज्य, विभाग व जिल्हा स्तरावरील अधिका-यांचे प्रशिक्षण. जिल्हा व तालुकास्तरीय परिचय प्रशिक्षण कार्यशाळा व विविध प्रशिक्षणे यांचे समन्वयन.<br>लोकसहभागीय नियोजन प्रक्रियेचे सनियंत्रण व समन्वयन.<br>प्रशिक्षण साहित्य निर्मिती, माहिती, शिक्षण व संवाद कार्यक्रम इ. |
| ३ | विभागीय स्तर उपआयुक्त (विकास) | विभागस्तरीय कार्यशाळा, विभाग स्तरावरील आढावा व सनियंत्रण, मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या बैठकामधून कार्यक्रमाचा आढावा, जिल्हा परिषद विकास आराखड्यातील बदलास मंजुरीबाबतची कार्यवाही,माहिती संकलन, शासनास व राज्य व्यवस्थापन कक्षास अहवाल |

| अ.क्र. | अधिकारी /कर्मचारी घटक | कर्तव्ये व जबाबदारी |
|---|---|---|
| | | सादर करणे. |
| ४ | जिल्हा स्तर<br>मुख्य कार्यकारी अधिकारी | १. कार्यक्रम अंमलबजावणी यशस्वीपणे व सुरळीतपणे पार पाडण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील.<br>२. पंचायत समिती स्तरावर प्रविण प्रशिक्षकांची निवड करणे.<br>३. कार्यक्रम निश्चित वेळापत्रकानुसार पूर्ण करून घेणे.<br>४. कार्यक्रमांचा व त्यातील प्रत्येक प्रक्रियेचा नियमित दरमहा सविस्तर आढावा घेणे.<br>५. भौतिक व आर्थिक प्रगतीचा नियमित आढावा घेणे.<br>६. ग्रामपंचायत, पंचायत समिती व जिल्हा परिषद पंचवार्षिक व वार्षिक विकास आराखडे संकलीत करणे.<br>७. प्रत्येक पंचायत समिती व जिल्हा परिषद स्तरावर प्रत्येक क्षेत्रात त्यांच्या निकड / गरजेप्रमाणे विविध योजना/ कार्यक्रमांची सांगड घालणे.<br>८. जिल्हा व तालुका स्तरीय सर्व प्रशिक्षणे, कार्यशाळा सुरळीतपणे पार पाडण्यासाठी आवश्यक ती दक्षता घेणे.<br>९. जिल्हा परिषदेच्या सर्व खाते प्रमुखांना व राज्य शासनाच्या जिल्हा स्तरीय विभाग प्रमुखांना याबाबत आवश्यक त्या सूचना देऊन त्यांचा पूर्ण सहभाग कार्यक्रमामध्ये राहील याची दक्षता घेणे.<br>१०. जिल्हा परिषद नियोजन समिती व जिल्हा स्तरावरील विविध क्षेत्रीय कार्यकारी गटांची स्थापना मार्गदर्शक सूचनेनुसार करणे.<br>११. क्षेत्रीय कार्यकारी गटांचे कामकाज सुरळीतपणे चालण्यासाठी सर्व संबंधीत अधिका-यांना आवश्यकत्या सूचना देणे.<br>१२. ग्रामपंचायत, पंचायत समिती व जिल्हा परिषद पातळीवरील लोकसहभागीय नियोजन |

| अ.क्र. | अधिकारी /कर्मचारी घटक | कर्तव्ये व जबाबदारी |
|---|---|---|
| | | प्रक्रियेचे सनियंत्रण करणे.<br>१३. पंचायत समिती व जिल्हा परिषद विकास आराखडयांची छाननी करणे.<br>१४. ग्रामपंचायत, पंचायत समिती व जिल्हा परिषद विकास आराखड्याच्या अंमलबजावणीवर देखरेख ठेऊन सनियंत्रण करणे.<br>१५. या उपक्रमासाठी उपलब्ध होणा-या निधीच्या विनियोगाचे सनियंत्रण करणे. |
| ५ | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी | १. पंचायत समिती व जिल्हा परिषद विकास आराखडा तयार करण्याच्या उपक्रमासाठी अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी हे नोडल ऑफिसर म्हणून काम पाहतील.<br>२. मुख्य कार्यकारी अधिकारी यांना वरील सर्व जबाबदा-या पार पाडण्यासाठी सहाय्य करणे.<br>३. पंचवार्षिक व वार्षिक विकास आराखडयांचे संकलन करणे.<br>४. जिल्हा व तालुका स्तरावरील प्रशिक्षण कार्यक्रमांचे नियोजन करणे.<br>५. माहिती, शिक्षण व संवाद / प्रशिक्षण साहित्य वितरित करणे.<br>६. पंचायत समिती व जिल्हा परिषद स्तरावरील दप्तर व कामांची नियमितपणे तपासणी करणे, अडचणी दूर करणे.<br>७. पंचायत समिती व जिल्हा परिषद पातळीवरील लोकसहभागीय नियोजन प्रक्रियेचे सनियंत्रण करणे.<br>८. पंचायत समिती व जिल्हा परिषद विकास आराखडे तयार करण्याच्या सर्व प्रकियेमध्ये सक्रिय सहभाग घेणे.<br>९. पंचायत समिती व जिल्हा परिषद विकास आराखड्याच्या अंमलबजावणीवर देखरेख ठेऊन सनियंत्रण करणे. |

| अ.क्र. | अधिकारी /कर्मचारी घटक | कर्तव्ये व जबाबदारी |
|---|---|---|
| | | १०.उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं.) हे प्रशिक्षण कार्यक्रमासाठी अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी यांना सहाय्य करतील. |
| ६ | जिल्हा परिषदेमधील विविध विभागांचे खातेप्रमुख | १. जिल्हा परिषदेच्या प्रत्येक खातेप्रमुखाने त्यांचेकडील संकलित माहितीच्या आधारे, प्रत्येक पंचायत समिती व जिल्हा परिषदेमध्ये उपलब्ध असणा-या सुविधा/सेवा व त्यामधील कमतरता, संबंधित क्षेत्रीय अधिका-या मार्फत कळविण्याची व्यवस्था करणे.<br>२. आपल्या विभागाच्या संबंधित बाबींवर पंचायत समिती व जिल्हा परिषद विकास आराखडा तयार करताना फलदायी चर्चा होण्याच्या दृष्टीने क्षेत्रीय अधिकारी/कर्मचा-यांना नियोजन प्रक्रियेमध्ये सहभागी होण्याच्या सुचना देणे.<br>३. जिल्हा व पंचायत समिती स्तरावरील त्यांच्या विभागाशी संबधित विषयाच्या क्षेत्रिय कार्यकारी गटाचे सदस्य सचिव म्हणून सक्रिय सहभाग घेणे.<br>४. तांत्रिक विभाग प्रमुखांनी आवश्यक तेथे पंचायत समितीस तांत्रिक मार्गदर्शन करणे.<br>५. पंचायत समिती व जिल्हा परिषद विकास आराखड्यामध्ये विभागाशी संबंधीत प्रकल्प/उपक्रम/कामांबाबत मार्गदर्शन करणे व त्याचे सनियंत्रण करून आढावा घेणे. |
| ७ | गट विकास अधिकारी | १. पंचायत समिती स्तरावर विविध विषयाच्या क्षेत्रिय कार्यकारी गटांची स्थापना करणे.<br>२. या गटाच्या कामासंबंधी देखरेख करून, तपासणी करणे.<br>३. पंचायत समिती व जिल्हा परिषद विकास आराखडा तयार करताना विविध टप्प्यावर मार्गदर्शन करणे. आराखड्यांची छाननी करणे,एकत्रीकरण करणे व एकूणच प्रक्रियेचे संनियंत्रणकरणे. |

| अ.क्र. | अधिकारी /कर्मचारी घटक | कर्तव्ये व जबाबदारी |
|---|---|---|
| | | ४. पंचायत समिती विकास आराखडा तयार करण्याच्या प्रक्रियामध्ये सक्रिय सहभाग घेऊन, गुणवत्ता पूर्ण आराखडे तयार करणे.<br>५. तालुका स्तरावरील विविध प्रचार प्रसिद्धीचे उपक्रम हाती घेणे व प्रचार प्रसिद्धी साहित्याचे वितरण करणे.<br>६. स्थानिक बोलीभाषा व लोककला, एफ.एम. रेडिओ, उपक्रमांचे विविध माध्यमांतून वार्तांकन इ. मधून प्रचार व प्रसिध्दी करणे.<br>७. तालुक्यातील सर्व ग्रामपंचायत विकास आराखड्यांचे एकत्रिकरण करून जिल्हा समितीस अहवाल सादर करणे.<br>८. पंचायत समिती विकास आराखड्याच्या अंमलबजावणीवर देखरेख ठेऊन सनियंत्रण करणे. |

**३.२. विविध घटकांच्या भूमिका:**

३.२.१ ग्रामपंचायत: लोकसहभागीय नियोजन प्रक्रियेमध्ये आणि आराखड्याची अमलबाजावणी यशस्वीपणे पूर्ण करण्यासाठी ग्रामपंचायतीची भूमिका अत्यंत महत्वाची राहील. ज्या उपक्रम/कामामुळे एकापेक्षा अधिक ग्रामपंचायतींना फायदा होणार आहे अशी कामे पंचायत समिती व जिल्हा परिषद विकास आराखडयामध्ये सुचविण्यात यावीत.

३.२.२ पंचायत समिती - तालुक्यातील सर्व ग्रामपंचायत विकास आराखडे विचारात घेऊन, मार्गदर्शक सूचनानुसार पंचायत समिती विकास आराखडा तयार करणे. त्यासाठी विविध विषयाच्या क्षेत्रिय कार्यकारी गटांची स्थापन करणे. या क्षेत्रिय कार्यकारी गटांना आवश्यक ती माहिती उपलब्ध होणेसाठी व त्यांचे अहवाल तयार करणेसाठी मार्गदर्शन करणे.

३.२.३. जिल्हा परिषद - जिल्ह्यातील सर्व ग्रामपंचायती व पंचायत समित्यांचे विकास आराखडे विहित मुदतीत तयार करुन घेऊन, त्यांचे संकलन व एकत्रीकरण करुन मार्गदर्शक सूचनानुसार जिल्हा परिषद विकास आराखडा तयार करणे. त्यासाठी विविध विषयाच्या क्षेत्रिय कार्यकारी गटांची स्थापन करणे. या क्षेत्रिय कार्यकारी गटांना आवश्यक ती माहिती उपलब्ध होणेसाठी व त्यांचे अहवाल तयार करणेसाठी मार्गदर्शन करणे.

३.२.४ जिल्हा परिषद व पंचायत समिती सदस्य: जिल्ह्यातील सर्व जिल्हा परिषद व पंचायत समिती सदस्यांना एक दिवसाचे प्रशिक्षण देऊन, त्यांना या कार्यक्रमाचा परिचय करून देण्यात येईल.

जिल्हा परिषद व पंचायत समिती विकास आराखडा तयार करण्यामध्ये व नियुक्त केलेल्या क्षेत्रिय कार्यकारी गटामध्ये सक्रिय सहभाग घेऊन, जिल्ह्यातील व तालुक्यातील विकासामधील कमतरता, विकसित व अविकसित क्षेत्रे, विविध योजनांचे अभिसरण, एका पेक्षा जास्त ग्रा.पं. मधील प्रकल्प/कामे, जि.प./ पं.स. विकास आराखड्यामध्ये प्रस्तावीत करावयाची कामे इ. बाबत सतर्क राहून,विकास आराखडे तयार करण्याच्या प्रक्रियेमध्ये सक्रिय सहभाग घेणे.

**३.३ तंत्रज्ञान, माहिती व तांत्रिक सहाय्य :**

३.३.१ पंचायत समित्या व जिल्हा परिषदांमार्फत जनतेला सेवा उपलब्ध करून देण्यासाठी व आपले कर्तव्य पार पाडण्यासाठी, पंचायत समिती व जिल्हा परिषद संगणकीय दृष्टीने सुसज्य असणे आवश्यक आहे. त्यासाठी सध्या अस्तित्वात असलेला जिल्हा परिषद,पंचायत समिती व ग्रामपंचायत स्तरावरील आपले सरकार सेवा केंद्र कक्षाचा पूर्ण क्षमतेने वापर करावा.

३.३.२ तसेच इ ग्रामस्वराज, मिशन अंत्योदय डेटा, भुवन पोर्टल, ग्राम मानचित्र, GIS Maps, MRSAC डाटा इत्यादींचा वापर विकासाच्या त्रुटीं (Gaps)/कमतरता/तफावतींचा शोध घेण्यासाठी अनिवार्य आहे. सर्वंकष नियोजन आराखडा तयार करण्यासाठी या तंत्रज्ञानाचा वापर प्रभावीपणे करावा.

३.३.३ केंद्र व राज्य शासनामार्फत या उपक्रमासाठी एक परिपुर्ण एमआयएस पद्धती विकसीत करण्यात आली आहे. यामध्ये दैनंदिन कामकाज व प्रगतीची माहीती वेळोवेळी अपडेट करावयाची असून ती संबंधीतांना पाहण्यासाठी उपलब्ध असेल.

३.३.४ साधन व्यक्ती / प्रशिक्षकासाठी टूलकीट: राज्य ग्रामीण विकास संस्थेमार्फत लोकसहभागी नियोजन प्रक्रीयेसाठी मार्गदर्शक पुस्तिका, वाचन साहित्य पुरविण्यात येईल.

**३.४ उपक्रमांचे सनियंत्रण:**

पंचायत समिती व जिल्हा परिषद पंचवार्षिक व वार्षिक विकास आराखडा तयार करण्याची प्रक्रिया, त्याची अंमलबजावणी व त्यानंतर निधीचे उपयोगिता इ. बाबत नियमीतपणे आढावा घेऊन सनियंत्रण करण्याची जबाबदारी खालील राज्य, जिल्हा व तालुका पातळीवरील समित्यांची राहील.

**३.४.१ राज्य स्तरीय सनियंत्रण समिती**

| | |
|---|---|
| मा. मंत्री, ग्रामविकास | अध्यक्ष |
| मा. राज्य मंत्री, ग्रामविकास | उपाध्यक्ष |
| अपर मुख्य सचिव, ग्रामविकास व पंचायत राज | सदस्य |
| विभागीय आयुक्त (ग्राम विकास विभागाद्वारा नामनिर्देशित) | सदस्य |
| मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान | सदस्य |
| आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना | सदस्य |

मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद (दोन) (ग्रामविकास विभागाद्वारा नामनिर्देशित) सदस्य

| | |
|---|---|
| संचालक, राज्य ग्रामीण विकास संस्था | सदस्य |
| राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय ग्रामस्वराज अभियान | सदस्य |
| उप सचिव, पंचायत राज | निमंत्रक |

**३.४.२ राज्य स्तरीय कार्यकारी समिती**

| | |
|---|---|
| अपर मुख्य सचिव, ग्रामविकास व पंचायत राज | अध्यक्ष |
| उप सचिव, ग्रामविकास (योजना) | सदस्य |
| उप सचिव, ग्रामविकास(वित्त) | सदस्य |
| संचालक, राज्य ग्रामीण विकास संस्था | सदस्य |
| राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय ग्रामस्वराज अभियान | सदस्य |
| उपायुक्त, विकास (दोन) (ग्रामविकास विभागाद्वारा नामनिर्देशित) | सदस्य |
| उप सचिव, पंचायत राज | निमंत्रक |

**३.४.३ जिल्हा स्तरीय सनियंत्रण समिती**

| | |
|---|---|
| अध्यक्ष, जिल्हा परिषद | अध्यक्ष |
| सभापती, विषय समित्या, जिल्हा परिषद(सर्व) | सदस्य |
| मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| अतिरीक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| जिल्हा परिषदेचे सर्व विभाग प्रमुख | सदस्य |
| उप मुख्य कार्यकारी अधिकारी, ग्रामपंचायत | निमंत्रक |

**३.४.४ जिल्हा स्तरीय कार्यकारी समिती**

| | |
|---|---|
| मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद | अध्यक्ष |
| अतिरीक्त मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद | उपाध्यक्ष |
| उपमुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व) | सदस्य |
| जिल्हा परिषदेचे सर्व विभाग प्रमुख | सदस्य |
| उपमुख्य कार्यकारी अधिकारी, ग्रामपंचायत | निमंत्रक |

**३.४.५ तालुका स्तरीय सनियंत्रण समिती**

| | |
|---|---|
| सभापती, पंचायत समिती | अध्यक्ष |
| उप सभापती, पंचायत समिती | सदस्य |

| | |
|---|---|
| सदस्य, पंचायत समिती (२) | सदस्य |
| तालुका स्तरीय खातेप्रमुख | सदस्य |
| गट विकास अधिकारी | सदस्य |
| सहाय्यक गट विकास अधिकारी | निमंत्रक |

**३.४.६ तालुका स्तरीय कार्यकारी समिती**

| | |
|---|---|
| गट विकास अधिकारी , पंचायत समिती | अध्यक्ष |
| तालुका स्तरीय खातेप्रमुख | सदस्य |
| तालुका स्तरीय विस्तार अधिकारी (सर्व) | सदस्य |
| कृषी अधिकारी व MSRLM प्रतिनिधी | सदस्य |
| सहाय्यक गट विकास अधिकारी | निमंत्रक |

## परिशिष्ट १
## आढळून आलेल्या समस्या आणि विकासात्मक पर्यायांचे विश्लेषण

| अ.क्र | आढळून आलेल्या समस्या | परिस्थितीचे विश्लेषण | विकासाचे संभाव्य पर्याय |
|---|---|---|---|
| १ | सार्वजनिक ठिकाणी अस्वच्छता | १.देखभाल दुरुस्ती अभावामुळे सामुदायिक शौचालय वापरण्या योग्य नसणे<br>२. मुक्त विसर्जन<br>३.स्वच्छता पद्धतींविषयी जागरूकता नसणे.<br>३ ग्राम आरोग्य व स्वच्छता समिती गठित नाही किंवा सक्रिय नाही<br>४.नवीन ड्रेनेज लाइनचे बांधकाम आवश्यक | १.सुधारित सामुदायिक शौचालयांचे बांधकाम/ दुरुस्ती व देखभाल<br>२.उघड्यावर शौच करण्याच्या दुष्परिणामांबद्दल जागरूकता निर्माण करणे<br>३.आरोग्य व स्वछता विषयक प्रचार करुन जागृती करणे<br>४.ग्राम आरोग्य व स्वच्छता समिती कार्यान्वित करणे .<br>५.नवीन ड्रेनेज लाइनचे बांधकामक करणे. |
| २. | कमी उत्पादकता पीक | १.उच्च जातीच्या पिकांविषयी जागरूकता नसणे.<br>२.आधुनिक कृषी तंत्रज्ञानाचा कमी वापर करणे<br>३.आयोग्य पीक संरक्षण उपाय | १.सुधारित कृषी पद्धतींबाबत जागरूकता निर्माण करणे.<br>२.तृणधान्ये, कडधान्ये आणि भाज्यांच्या उच्च जातींचा परिचय.<br>३.सुधारित शेती/ कृषी विज्ञान केद्रांना अभ्यास भेट.<br>४.शेती पद्धतीविषयी कृषी विभागा सोबत नियमितपणे संवाद |
| ३. | मागासवर्गीय मुलांमध्ये कुपोषण | १.गर्भवती महिला आणि मुलांना संतुलित आहाराची कमतरता.<br>२.पौष्टिक आहारावर कमी खर्चात जीवन जगणारे गरीब | १.संतुलित आहाराच्या गरजेबद्दल जागरूकता निर्माण करणे.<br>२. ग्राम आरोग्य व स्वच्छता समिती मजबूत करणे.<br>३.पौष्टिक भाज्या फळांचा स्त्रोत |

| अ.क्र | आढळून आलेल्या समस्या | परिस्थितीचे विश्लेषण | विकासाचे संभाव्य पर्याय |
|---|---|---|---|
| | | जीवनमान.<br>३.परसबागे बाबत जागृतता नाही. | म्हणून परसबाग प्रोत्साहित करणे. |
| ४. | शिक्षणाच्या गुणवत्तेचा अभाव | १.दर्जेदार अध्यापन पद्धती आणि साहित्याचा अभाव.<br>२.ग्राम शिक्षण समितीद्वारे शिक्षकांचे कामकाजावर देखरेख नाही. | १.अध्यापनाच्या गुणवत्तेवर नजर ठेवण्यासाठी ग्राम शिक्षण समिती मजबूत करणे.<br>२. अध्यापन उपकरणांचा पुरवठा<br>३. विज्ञान प्रयोगशाळेसाठी नवीन उपकरणे खरेदी करणे. |

## परिशिष्ट २

## परिस्थिती मूल्यांकनाची प्रक्रिया/ कार्यपध्दती

१. पंचायतीची परिस्थिती-परिस्थितीच्या विश्लेषणावर आधारित त्यांची समाजिक- आर्थिक स्थितीचे वर्णन करते.

२. पंचायत समितीच्या कार्यक्षेत्रामध्ये मागील ३ ते ५ वर्षात झालेल्या विकासाचे व त्यामधील कमतरतेचे विश्लेषण व मुल्यांकन करणे. त्यासाठी क्षेत्रीय कार्यकारी गट खालील मापदंड निवडू शकतात. १. आर्थिक विकास आणि दारिद्रय कमी करणे.

१. आर्थिक विकास आणि दारिद्रय कमी करणे.

२. मानवी विकास.

३. सामाजिक विकास.

४. पर्यावरणीय विकास.

५. सार्वजनिक सेवा वितरण.

६. सुशासन.

७. शाश्वत विकासाची ध्येये (एसडीजी)

८. कौशल्य विकास.

९. महिला आणि बाल संरक्षण आणि विकास.

१०. ई-सक्षमता.

११. पायाभूत सुविधा.

३. लोकांच्या सहभागाचे वर्णन आणि त्या सुधारण्यासाठी सूचना.

४. स्वत:च्या उत्पन्ना (ओएसआर) सह संसाधन लिफाफा विस्तृत करण्यासाठी संसाधनांची स्थिती आणि व्याप्ती.

५. पंचायत विकास परिणाम अनुकूलित मानवी, आर्थिक आणि नैसर्गिक संसाधने दृष्टीने एकत्रित संधी.

६. संभाव्य हस्तक्षेपाची क्षेत्रानुसार विस्तृत कल्पना.

७. मिशन अंत्योदय आणि ग्रामपंचायत विकास आराखडयाच्या एकत्रित डेटाच्या प्रती

८. निष्कर्ष.

## परिशिष्ट ३

## पंचायत समिती व जिल्हा परिषद सभेत इतर विभागांच्या प्रतिनिधींनी सादर करावयाच्या सादरीकरणाचा आदर्श नमुना

१. संबंधित विभागांचे प्रतिनिधी त्यांच्या विभागाशी संबंधित कार्यक्रम/योजनांचा थोडक्यात आढावा सादर करतील. त्यामध्ये कार्यक्रम/योजनांचा पात्रता निकष, मिळणारा लाभ, निवड प्रक्रिया इ. तपशीलांचा समावेश असेल.

| अ.क्र. | कार्यक्रम/ योजना/ उपक्रमाचे नाव | योजनेंतर्गत समाविष्ट बाबी | लाभार्थी निवडीसाठी पात्रता व प्रक्रिया | इतर पात्रता निकष व योजनेचे फायदे |
|---|---|---|---|---|
| १ | | | | |
| २ | | | | |

**२. चालू आर्थिक वर्षात घेण्यात आलेल्या योजना/उपक्रम आणि आतापर्यंतची प्रगती.**

| अ.क्र. | कार्यक्रम/ योजना/ उपक्रमाचे नाव | काम/उपक्रम निहाय स्थिती अहवाल | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | प्रगती स्थिती | | | कालमर्यादा | | निधी वापर स्थिती | |
| | | काम/ उपक्रम पूर्ण | काम/ उपक्रम प्रगतीपथावर | सुरू न झालेले काम/उपक्रम | नियोजित कालमर्यादा | काम करण्यासाठी लागलेला वेळ | प्राप्त निधी | वापरलेला निधी |
| | | | | | | | | |

**३. पुढील आर्थिक वर्षात प्रस्तावीत केलेल्या योजना/उपक्रम**

| अ.क्र. | कार्यक्रम/ योजना/ उपक्रमाचे नाव | योजनेंतर्गत समाविष्ट बाबी | लाभार्थी निवडीसाठी पात्रता व प्रक्रिया | इतर पात्रता निकष व योजनेचे फायदे |
|---|---|---|---|---|
| १ | | | | |
| २ | | | | |

## परिशिष्ट ४
## प्रकल्प अहवाल नमुना

| प्रकल्प / उपक्रम / कामाचे नाव : | | |
|---|---|---|
| १ | वर्ष | ज्या वर्षात प्रकल्प सुरु करावयाचा आहे ते वर्ष नमूद करण्यात यावे. |
| २ | विभाग | वार्षिक विकास आराखडयात नमूद केल्या प्रमाणे |
| ३ | पार्श्वभूमी | गरजांचे विश्लेषण व गावाची पार्श्वभूमी देण्यात यावी. |
| ४ | प्रकल्पाची उद्दिष्टे | प्रकल्पातील अंतर्भूत बाबींची उद्दिष्टये व करावयाचे साध्य नमूद करावे |
| ५ | घटक/प्रकल्प बाबी | प्रकल्पाच्या प्रमुख घटकांची थोडक्यात माहिती सादर करावी |
| ६ | घटक निहाय अंदाजित खर्च | |
| ७ | एकूण अंदाजित खर्च | |
| ८ | प्रकल्पासाठी निधीचा स्त्रोत ( इतर योजनांशी अभिसरण केले असल्यास तसा उल्लेख करावा) | स्वनिधी, वित्त आयोग, मनरेगा, व इतर स्त्रोतांची माहिती द्यावी. |
| ९ | प्रकल्पाचे ठिकाण | |
| १० | प्रकल्पासाठी आवश्यक जागा | |
| ११ | प्रकल्पासाठी उपलब्ध असणारी जागा | सर्व्हे नं./ क्षेत्र नमूद करावे |
| १२ | प्रकल्प जागेची मालकी | शासकीय/ खाजगी/निकाय |
| १३ | अंमलबजावणीची रणनीती (अंमलबजावणी करणारी यंत्रणा/एजन्सी, अतिरिक्त स्त्रोत जमा करणे, ऐच्छिक सहभाग, पर्यवेक्षण इ. ) | |
| १४ | काम सुरू करण्याचा अपेक्षित दिनांक | |
| १५ | काम पुर्ण होण्याचा अपेक्षित दिनांक | |
| १६ | प्रकल्प शासनाच्या विहित मार्गदर्शक सुचना व निकषानुसार आहे काय? | |
| १७ | प्रकल्पाचा लाभ/फायदा काय आहे? | अपेक्षित परिणाम |

| प्रकल्प / उपक्रम / कामाचे नाव : | | |
|---|---|---|
| १८ | प्रकल्पाचा अपेक्षित लाभ/फायदा | प्रकल्पाने लाभान्वित होणारी कुटुंब संख्या नमूद करावी. |
| १९ | प्रकल्प पूर्ण झाल्यावर, त्याची व्यवस्था कशी<br>असेल? | |
| २० | अपेक्षित परिणाम | अपेक्षित फलनिष्पत्ती |

## परिशिष्ट ५
## पंचायत समिती / जिल्हा परिषद विकास आराखड्याची रचना

| अ क्र | प्रकरणाचे नाव | तपशील |
|---|---|---|
| प्रकरण-१ | जिल्हा व जिल्हा परिषदेची माहिती तसेच तालुका व पंचायत समितीची माहिती | १(जिल्हा व जिल्हा परिषद) सर्वसाधारण माहिती .<br>अजाती .अनु (, अनुजमाती आणि मागासवर्गीयसहित .<br>.ग्रामपंचायत निहाय लोकसंख्या माहिती<br>आभौगोलिक क्षेत्राचे वर्णन (, जंगलाचे संरक्षण, नदीची स्थिती, रस्ता कनेक्टिव्हिटी रेल्वे जोडणी /, इंटरनेट सेवा आणि जिल्हा/तालुक्याची विशेष वैशिष्ट्ये.<br>इजनगणना) आर्थिक स्थिती-सामाजिक (, एसईसीसी डेटा, जिल्हा सांख्यिकी पुस्तिका.वर आधारित (<br>ई) शैक्षणिक संस्थांची संख्या आणि शिक्षणाची स्थिती.<br>उप्रा (थमिक आरोग्य केंद्रे व उपकेंद्रांची संख्या<br>आरोग्य उपकेंद्रे, प्राथमिक आरोग्य केंद्रे, ग्रामीण रुग्णालये आणि सार्वजनिक आरोग्यासह आरोग्याची स्थिती<br>ऊ) पिण्याचे पाणी आणि स्वच्छतेची स्थिती.<br>ए.अंगणवाडी केंद्रांची संख्या व पोषण स्थिती (<br>क( तालुक्यात कार्यरत असलेल्या विभागीय कार्यालयांची नावे.<br>ख) बँक शाखांची संख्या<br>ग) सहकारी संस्थांची संख्या.<br>घमंडी / बाजारपेठांची संख्या (, शीतगृह इ. |

| अ क्र | प्रकरणाचे नाव | तपशील |
|---|---|---|
| | | च) पशु आरोग्य केंद्र.रुग्णालये संख्या/<br>छ.पाटबंधारे व लघु सिंचनची स्थिती (<br>ज.पिकांची तीव्रता (<br>झ) मुख्य व्यवसाय आणि उपजिवीकेची स्थिती.<br>ट.सार्वजनिक वितरण व्यवस्थेची स्थिती (<br>ठ.वीजपुरवठ्यासह औद्योगिक एककांची संख्या (<br>ड.खाणी व खनिजांची स्थिती (<br>ढ.बचत गट आणि त्यांच्या संघटनांविषयी माहिती (<br>ण) परिवहन व्यवस्थेची स्थिती.<br>त) आपत्ती व्यवस्थापन व्यवस्थेची स्थिती.<br>थ) जर पेसा जिल्हा असेल तर पेसाच्या अंमलबजावणीची स्थिती.<br>दक्षेत्रामध्ये आदिवासी लोकसंख्या आणि जंगल ( असल्यास वन अधिकार कायद्याच्या अंमलबजावणीची स्थिती दर्शविली जाऊ शकते.<br>ध) इतर संबंधित सामान्य माहिती.<br>(वरील यादी स्पष्टीकरणात्मक आहे) |
| | | २जिल्हा . परिषद / पंचायत समितीबद्दल माहिती<br>जिल्हा (ए) परिषद/ पंचायत समिती सदस्यांची संख्या .<br>बी) जिल्हा परिषद/ तालुका पंचायत मधील एकूण कर्मचारी संख्या .(प्रवर्गानुसार)<br>सी))............................<br>..............................(डी)<br>............................(इ)<br>एफ...............................(<br>(जी) जिल्हा परिषद/ पंचायत समिती संबंधी इतर सर्वसाधारण माहिती. |
| | | (३) व्हिजन स्टेटमेंट. |
| प्रकरण-२ | मागील वर्षांत पूर्ण केलेली कामे आणि प्रगती पथावरील कामे | मागील आर्थिक वर्षाचा प्रगती अहवाल, मागील अपूर्ण कामे, नवीन मंजुर केलेली कामे, यापैकी पूर्ण व प्रगतीत |

| अ क्र | प्रकरणाचे नाव | तपशील |
|---|---|---|
| | | कामे.<br>एकूण प्राप्त निधी, झालेला खर्च, शिल्लक निधी .<br>अपूर्ण कामे पूर्ण करण्यासाठी लागणारा निधी इ. |
| प्रकरण ३- | नियोजन प्रक्रियेची संक्षिप्त माहिती | या प्रकरणात नियोजन प्रक्रियेची थोडक्यात माहिती असू शकते ज्यात जिल्हा परिषद/ पंचायत समिती सभा, क्षेत्रीय कार्यकारी गटांची स्थापना, नियोजन प्रक्रियेत राज्य शासनाच्या इतर विभागाच्या अधिकाऱ्यांचा सहभाग, पर्यावरण निर्मिती, डेटा संकलन यांचा समावेश करावा. |
| प्रकरण ४- | विकासाची सद्यस्थिती:, मुख्य आव्हाने आणि त्यांचे निराकरण करण्याचे क्षेत्र | या प्रकरणात राज्यघटनेच्या व्या अनुसूचीमध्ये नमूद ११ केल्याप्रमाणे क्षेत्रामधील विकासाच्या सद्यस्थितीचा सारांश असू शकतो, मागील आर्थिक वर्षात राबविल्या गेलेल्या प्रमुख योजनाउपक्रम/, परिस्थिती आणि तफावतीचे विश्लेषण, प्रमुख आव्हाने.<br>सन दरम्यान २२-२०२१ आणि २१-२०२० संसाधनांची उपलब्धता आणि आव्हाने पूर्ण करण्याची .व्याप्ती |
| प्रकरण ५- | शाश्वत विकासाची ध्येयांशी निगडीत विकास आराखडयातील उद्दिष्टे | या प्रकरणात घटनेच्या ११ व्या अनुसूची आणि शाश्वत विकासाच्या ध्येयामध्ये नमूद केल्यानुसार २ ९ विषयांच्या लक्ष्यासह निश्चित केलेल्या ध्येयांविषयी आणि त्यांचे साध्य करण्याचे पुढील वर्षांचे नियोजन प्रस्तावित असून एक ४ .वर्षाची कार्यात्मक योजना असू शकते |
| प्रकरण ६- | संसाधनांचा समावेश आणि प्राथमिकता असलेल्या कार्यांची निवड | या प्रकरणात सन २०२१२०२ आणि २२-२मध्ये २०२३-योजनेच्या अंमलबजावणीसाठी उपलब्ध असलेल्या स्रोतांची तपशीलवार माहिती असू शकते, ज्यामध्ये स्वतःचा स्रोतमहसूल ,, पंधरावा वित्त आयोग अनुदान, राज्य वित्त आयोग अनुदान, केंद्रीय क्षेत्र योजना, राज्य योजना, सोबतच्या विभागांसह उपलब्ध संसाधने, विकास प्राधिकरण बोर्ड कडून उपलब्ध निधी /, इतर उपलब्ध संसाधने, अनुदानित कार्यक्रम इ . |
| प्रकरण ७- | २-२०२१२ व २-२०२२३ च्या आराखड्यामधील | प्राधान्यक्रमातील कामांचा समावेश करण्याच्या युक्तिवादानुसार सन २०२१या २३-२०२२ आणि २२- |

| अ क्र | प्रकरणाचे नाव | तपशील |
|---|---|---|
| | योजनाउपक्रमांची माहिती/ | मलबजावणीवर्षामध्ये अंसाठी प्रस्तावित योजना.उपक्रमांची माहिती/ |
| प्रकरण ८- | अंमलबजावणी | या प्रकरणात योजना आराखड्यातील कामांच्या अंमलबजावणीची रणनीती आणि प्रक्रिया, इतर विभागांसह विविध संस्थांची भूमिका, ग्राम पंचायत, पंचायत समिती आणि जिल्हा परिषदेशी जोडणी आणि इतर संबंधित बाबींचा समावेश असू शकतो. |
| प्रकरण ९- | देखरेख आणि मुल्यांकन | या प्रकरणात योजना उपक्रमांची देखरेख आणि मूल्यांकन करण्याची कार्यनीती आणि प्रक्रिया, राज्य शासनाच्या विभागांसह विविध संस्थांची भूमिका, ग्राम पंचायत, पंचायत समिती आणि जिल्हा परिषदेशी जोडणी आणि इतर संबंधित बाबींचा समावेश असू शकतो. |
| | परिशिष्टे | वेगवेगळ्या स्त्रोतांमधील नकाशाडेटा सारांश-, एकत्रित मिशन अंत्योदय डेटा, चालू वर्षातील ग्रामपंचायतींची नियोजित कामे, बैठकीची इतिवृत्ते, क्षेत्रीय कार्यकारी गटांचे अहवाल, छायाचित्रे इ. |

## परिशिष्ट ६
## पंचायत समिती /जिल्हा परिषद विकास आराखडा नमुना

| अ. न. | विकासाचे क्षेत्र | योजना/ काम/ उपक्रमाचे नाव | भौतिक लक्ष (क्षेत्र, लाभार्थी इ.) | अंदाजपत्रक (रु. लाख) | मुख्य निधीचा स्रोत | इतर स्रोत (अभिसरण असल्यास) | उपक्रम सुरु व पूर्ण करण्याचा अपेक्षित दिनांक | भौतिक साध्य | शेरा (कोणत्या शाश्वत विकासाच्या ध्येयांशी निगडीत) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | | | |
| | | | | | | | | | |
| | | | | | | | | | |

## परिशिष्ट ७
## माहिती फलक नमुना



महाराष्ट्र शासन

पंचायती राज

| | |
|---|---|
| ग्रामपंचायत :------------------------------ | एल.जी.डी. कोड :------------------------------ |
| तालुका :------------------------------ | महसूली गावांची नावे :------------------------------ |
| जिल्हा :------------------------------ | एकूण लोकसंख्या :------------------------------ |
| राज्य :------------------------------ | अनु.जाती लोकसंख्या :------------------------------ |
| संरपंचाचे नाव :------------------------------ | अनु.जमाती लोकसंख्या :------------------------------ |

अ) सन २०२१-२२ मध्ये आराखड्यातील उपक्रम / कामांचा तपशिल

| अ.क्र. | योजनेचे नाव | उपक्रमाचे नाव | निधी |
|---|---|---|---|
| | | | |
| | | | |
| | | | |
| | | | |

ब) सन २०२२-२३ च्या आराखड्यातील ग्रा.पं.ने निश्चित केलेलले उपक्रम / कामांचा तपशिल

| | | | |
|---|---|---|---|
| | | | |
| | | | |
| | | | |

मिशन अंत्योदय सर्वेक्षणामधून निदर्शनास आलेल्या तफावती (Critical Gaps)

- 
- 
- 
- 
- 
- 
- 



जिल्हा परिषद/पंचायत समितीचे नाव: --------------

जिल्हा: -------------------------------

अध्यक्ष / सभापतीचे नाव: ------------------

## परिशिष्ट ८
## ग्रामपंचायत विकास आराखडयांचे एकत्रीकरण

### अ. ग्रामपंचायतींचे एकत्रित अपेक्षीत उत्पन्न

| अ.क्र. | तालुक्याचे नाव | तालुक्यातील एकूण ग्रा.पं संख्या | तालुक्यातील सर्व ग्रा.पं.चे एकत्रित अपेक्षीत उत्पन्न | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | स्वनिधी | वित्त आयोग | | मनरेगा | स्वच्छ भारत | इतर निधी | एकूण |
| | | | | बंधित | अबंधित | | | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| | | | | | | | | | |
| | | | | | | | | | |

### ब. ग्रामपंचायत विकास वार्षिक आराखडयामध्ये प्रमुख विभागांतर्गत प्रस्तावित उपक्रम व रक्कमेचा तपशिल

| अ. क्र. | तालुक्याचे नाव | तालुक्यातील एकूण ग्रा.पं संख्या | १५ व्या वित्त आयोगाचा बंधित निधी | | | | शिक्षण | | आरोग्य | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | पाणीपुरवठा | | स्वच्छता | | | | | |
| | | | उपक्रम संख्या | रक्कम | उपक्रम संख्या | रक्कम | उपक्रम संख्या | रक्कम | उपक्रम संख्या | रक्कम |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |

| उपजिवीका व पोषण | | एकूण | | महिला व बालकल्याण विकास | | मागासवर्गीयां चा विकास | | बांधकामे | | रस्ते | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| उपक्रम संख्या | रक्कम | उपक्रम संख्या | रक्कम | उपक्रम संख्या | रक्कम | उपक्रम संख्या | रक्कम | उपक्रम संख्या | रक्कम | उपक्रम संख्या | रक्कम |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ |

| कृषी | | पशु संवर्धन | | जलसंधारण | | सौर व अपारंपारिक उर्जा | | विविध प्रशिक्षणे | | इतर (असल्यास तपशील) | | एकूण | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| उपक्रम संख्या | रक्कम | उपक्रम संख्या | रक्कम | उपक्रम संख्या | रक्कम | उपक्रम संख्या | रक्कम | उपक्रम संख्या | रक्कम | उपक्रम संख्या | रक्कम | उपक्रम संख्या | रक्कम |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ |

## परिशिष्ट ९

## पंचायत समिती विकास आराखडयांचे एकत्रीकरण

### अ. पंचायत समितीत्यांचे अपेक्षीत उत्पन्न

| अ.क्र. | पंचायत समितीचे नाव | स्वनिधी | वित्त आयोग | | इतर निधी | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | बंधित | अबंधित | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| | | | | | | |
| | | | | | | |

### बपंचायत समित्यांच्या वार्षिक विकास आराखडयामध्ये प्रमुख विभागांतर्गत प्रस्तावित उपक्रम . व रक्कमेचा तपशिल

| अ. क्र. | पंचायत समितीचे नाव | १५ व्या वित्त आयोगाचा बंधित निधी | | | | शिक्षण | | आरोग्य | | उपजिवीका व पोषण | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | पाणीपुरवठा | | स्वच्छता | | | | | | | |
| | | उपक्रम संख्या | रक्कम | उपक्रम संख्या | रक्कम | उपक्रम संख्या | रक्कम | उपक्रम संख्या | रक्कम | उपक्रम संख्या | रक्कम |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ |

| एकूण | | महिला व बालकल्याण विकास | | मागासवर्गीयांचा विकास | | बांधकामे | | रस्ते | | १कृषी | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| उपक्रम संख्या | रक्कम | उपक्रम संख्या | रक्कम | उपक्रम संख्या | रक्कम | उपक्रम संख्या | रक्कम | उपक्रम संख्या | रक्कम | उपक्रम संख्या | रक्कम |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ |

| पशु संवर्धन | जलसंधारण | सौर व अपारंपारिक उर्जा | विविध प्रशिक्षणे | इतर (असल्यास तपशील) | एकूण |
|---|---|---|---|---|---|

